

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

30/12/03

वर्ष ५७ । अंक ५ । फेब्रुवारी २००३

## नवभारत

एकविसाव्या शतकारंभी *'नवभारत'* सारख्याप्रगल्भ वैचारिक नियतकालिकाची धुरा सांभाळण्याचा योग येणे ही एकाच वेळी गौरवाची पण अंतर्मुख करणारी घटना आहे. एका बाजूला वर्तमान सामाजिक वास्तवातून निर्माण झालेले अनेकविध प्रश्न व पेच आहेत तर दुसऱ्या बाजूला *'नवभारत'*च्या आजवरच्या वाटचालीतून प्रकट झालेली वैचारिक आणि सामाजिक बांधिलकी व त्याबाबतचे उत्तरदायित्व आहे. या दोहोंचा तोल सांभाळण्याचे भान जागविल्याशिवाय हाती आलेल्या कार्याचा श्रीगणेशाच संभवत नाही.

### नवभारत

भारतीय स्वातंत्र्य आणि *'नवभारत'* चे जन्मसाल एकच. या दोहोंतील सहोदरत्वाचे नाते हा निव्वळ योगायोग नव्हता. भारतीय स्वातंत्र्य आंदोलनात जे विचारांचे अमृतमंथन झाले त्याचा एक स्वाभाविक परिपाक म्हणजे *'नवभारत'*चा जन्म.

### *नवभारत*

नित्य बदलणाऱ्या जीवनात सृष्टीचे सातत्य जसे निसर्गातील नियमबद्धतेमुळे आश्वस्त होते, तसेच समाजाचे सातत्यही अतिताची आस, सान्ताच्या मर्यादा उल्लंघून जाण्याचा मानवाचा ध्यास; त्यातून उद्‌भवणारी स्वातंत्र्याकांक्षा व दास्यविरोधी वृत्ती; सहअस्तित्वाची निकड व त्यातून येणारी समता व बंधुतेची उर्मी; अन्यायाविरुद्धची चीड व त्यातून येणारी न्याय बुद्धी यासारख्या सनातन मानवी मूल्यांमुळेच संभवते, टिकते व वाढते. हे सातत्य मानवी जीवनाला स्थिरता देते. या स्थिरतेतूनच समाजजीवनाची नित्यता व त्यातून येणारी निश्चितता माणूस अनुभवतो. इतकेच नव्हे तर या निश्चिततेच्या बळावरच तो अनित्य जीवनात नित्यता शोधतो.

### नवभारत

ही नित्यताच माणसाला प्रयोगशील व प्रयत्नवादी बनवते. त्याच्या कर्तबगारीस व सिद्धीस अवकाश उपलब्ध करून देते. या अवकाशातच माणूस आपला भूतकाळ न्याहाळतो, त्यापासून शिकतो, प्रेरणाही घेतो. वर्तमानाला आशय बहाल करतो. भविष्याचा वेध घेतो. नवी नाती, नवे सामाजिक संबंध, नव्या संस्था, नवे ज्ञान-विज्ञान, नवी विचार दर्शने व त्या आधारे नव-समाज-निर्मितीचे प्रकल्प संकल्पितो व राबवतो. माणसाला उपलब्ध होणाऱ्या या अवकाशाचे भान *'नवभारत'*ने सतत जागविले. म्हणूनच त्यास परंपरेचा ना कधी काच जाणवला ना नवमताचा धसका.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५७ । अंक ५ । फेब्रुवारी २००३
पौष-माघ, शके १९२४
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संचालक व संपादक सहमत असतीलच असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळा मंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
सरोजा भाटे

**कार्यकारी संपादक :**
यशवंत सुमंत

**संपादक मंडळ :**
श्री. वसंत पळशीकर, डॉ. सुधीर रसाळ,
श्री. सीताराम रायकर, श्री. यशवंत कळमकर

30/12/03

**संपादकीय पत्रव्यवहार :**
कार्यकारी संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाचा मंडळाच्या "नियतकालिकांचा स्थायी निधी" योजनेत समावेश केला असला तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच असे नाही.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

फेब्रुवारी २००३

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संपादकीय

# ‘*नवभारत*’/ता पुढील आव्हाने व ‘*नवभारत*’चे आवाहन

यशवंत सुमंत

एकविसाव्या शतकारंभी ‘*नवभारत*’ सारख्याप्रगल्भ वैचारिक नियतकालिकाची धुरा सांभाळण्याचा योग येणे ही एकाच वेळी गौरवाची पण अंतर्मुख करणारी घटना आहे. एका बाजूला वर्तमान सामाजिक वास्तवातून निर्माण झालेले अनेकविध प्रश्न व पेच आहेत तर दुसऱ्या बाजूला ‘*नवभारत*’च्या आजवरच्या वाटचालीतून प्रकट झालेली वैचारिक आणि सामाजिक बांधिलकी व त्याबाबतचे उत्तरदायित्व आहे. या दोहोंचा तोल सांभाळण्याचे भान जागविल्याशिवाय हाती आलेल्या कार्याचा श्रीगणेशाच संभवत नाही.

भारतीय स्वातंत्र्य आणि ‘*नवभारत*’चे जन्मसाल एकच. या दोहोंतील सहोदरत्वाचे नाते हा निव्वळ योगायोग नव्हता. भारतीय स्वातंत्र्य आंदोलनात जे विचारांचे अमृतमंथन झाले त्याचा एक स्वाभाविक परिपाक म्हणजे ‘*नवभारत*’चा जन्म. सर्वश्री शंकरराव देव, हरीभाऊ मोहनी, आचार्य, शं.द. जावडेकर आणि आचार्य स.ज. भागवत हे ‘*नवभारत*’चे जन्मदाते, भारतीय स्वातंत्र्य आंदोलनाचे महाराष्ट्रातील अग्रगण्य स्वातंत्र्य सैनिक होते. स्वातंत्र्य आंदोलनाच्या काळात जाग्या झालेल्या विविध सामाजिक शक्तींची विचारस्पंदने त्यांनी टिपली आणि समाजाला समजावून दिली. त्याच बरोबर या शक्तींच्या आकांक्षा, भावी भारताबद्दलची त्यांची स्वप्ने व जगभर वहाणाऱ्या व्यवस्था परिवर्तनाच्या वाऱ्याची वार्ता करीत स्वातंत्र्योत्तर भारतीय समाजाची पुनर्बांधणी कोणत्या तत्त्वांच्या अनुरोधाने व्हायला हवी याचाही त्यांनी उहापोह केला. ही सर्व मंडळी जन्माने महाराष्ट्रीय होती; पण त्यांची दृष्टी अखिल भारतीय आणि वैश्विकही होती. इतकेच नव्हे तर स्वातंत्र्योत्तर भारताच्या जडणघडणीमध्ये महाराष्ट्राने आपला वैचारिक वाटा दृढ संकल्पाने उचलला पाहिजे अशी गाढ श्रद्धा त्यांच्या ठायी होती. ही क्षमता महाराष्ट्रातील विचारक व अभ्यासकांच्या अंगी आहे हा आत्मविश्वासही त्यांना होता. ‘भौतिक दारिद्र्य’ आणि ‘सामाजिक विषमता’ या दोन समस्यांशी प्राधान्याने मुकाबला करीत मार्क्सचा समाजवाद, गांधींचा सत्याग्रह विचार, युरोपचा बुद्धीवाद या वैचारिक सामग्रीवर विसंबून पण त्यांचे अंधानुकरण न करता; तसेच भौतिक शास्त्रे, आर्थिक संघटनेची विद्या आणि लोकशाही तंत्राच्या सहाय्याने महाराष्ट्रातील विचार व आम बहुजन समाज यांच्यातील वैचारिक दरी अधिकाधिक अरुंद करीत नवसमाज रचनेचा प्रकल्प राबविता येईल असा सार्थ विश्वास या मंडळींना होता. या विश्वासाला मुखर करण्या-साठीच, एका परीने ‘*नवभारत*’चा जन्म झाला असे म्हटल्यास वावगे ठरू नये. म्हणूनच “व्यक्तिविकास, समाजाची धारणा व उत्कर्ष यांचा समन्वय घालून सत्य, शिव व सुंदर यांचा साक्षात्कार करून घेण्याचा मार्ग कोणता हे दाखविण्याचा प्रयत्न हे ‘*नवभारत*’चे कार्य आहे” असा निर्धार शंकरराव देवांनी ‘संचालकांच्या मनोगतात’ व्यक्त केला होता व त्याला अनुसरून ‘सर्वेषां अविरोधेन’ वृत्तीने ‘*नवभारत*’ने आजवरची आपली वाटचाल केली.

शंकराव देव, आचार्य जावडेकर, स.ज. भागवतांपासून ते तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, गोवर्धन पारीख, मे.पुं. रेगे आणि श्री. वसंतराव पळशीकर यांच्या वैचारिक प्रकाशात ‘*नवभारत*’ने केलेला आजवरचा प्रवास हा निव्वळ अर्धशतकाची वा चार-दोन पिढ्यांची कालक्रमणा नव्हती तर भारताच्या सामाजिक-राजकीय विकासाला प्रतिबिंबित करीत त्या वास्तवाला यथाशक्ती आकार, दिशा व आशय देणाऱ्या विचारांचे ते अवस्थांतरणही होते. एका बाजूला भारतीय विचार परंपरांचा वेध घेत तर दुसऱ्या बाजूला स्वातंत्र्योत्तर भारताच्या समाज-विकासाची लय पकडून ‘*नवभारत*’ बदलत्या परिस्थितीला सामोरे गेले. त्या परिस्थितीचा त्याने अन्वयार्थ लावला. त्याकामी महत्त्वपूर्ण ठरणाऱ्या विविध विचार-परिप्रेक्ष्यांची त्याने दखल घेतली. त्या संदर्भातील विविध विचार व मतप्रवाहांना कधी आमंत्रून तर कधी थेट भिडून त्यांचे एकाच वेळी स्वागत व चिकित्साही केली. ती करीत असताना स्वातंत्र्य, समता, बंधुत्व, सामाजिक न्याय, विवेकनिष्ठा, परमतसहिष्णुता, धर्म-जात निरपेक्ष नागरिकता, लोकशाही व वैचारिक सम्यकता या निष्ठांची कास न सोडण्याची व्रतस्थताही ‘*नवभारत*’ने जाणीवपूर्वक जोपासली. त्यामुळेच ‘*नवभारत*’च्या या मूल्यात्मक धारणांचा प्रवाह अखंड वाहत राहिला.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**अनित्यता-सातत्य आणि नित्यता**

या मूल्यांवरील निष्ठेमुळेच *'नवभारत'*चे वैचारिक सातत्य अबाधित राहिले. नित्य बदलणाऱ्या जीवनात सृष्टीचे सातत्य जसे निसर्गातील नियमबद्धतेमुळे आश्वस्त होते, तसेच समाजाचे सातत्यही अतिताची आस, सान्ताच्या मर्यादा उल्लंघून जाण्याचा मानवाचा ध्यास; त्यातून उद्‌भवणारी स्वातंत्र्याकांक्षा व दास्यविरोधी वृत्ती; सहअस्तित्वाची निकड व त्यातून येणारी समता व बंधुतेची उर्मी; अन्यायाविरुद्धची चीड व त्यातून येणारी न्याय बुद्धी यासारख्या सनातन मानवी मूल्यांमुळेच संभवते, टिकते व वाढते. हे सातत्य मानवी जीवनाला स्थिरता देते. या स्थिरतेतूनच समाजजीवनाची नित्यता व त्यातून येणारी निश्चितता माणूस अनुभवतो. इतकेच नव्हे तर या निश्चिततेच्या बळावरच तो अनित्य जीवनात नित्यता शोधतो, क्षणजीवी घटनाक्रमांत चिरंतनतेचा ध्यास घेतो व ध्यासातूनच आपली भौतिकता आणि अध्यात्मिकता साकारतो. माणसाने निर्मिलेली अवजारे व हत्यारे, वस्त्या व साम्राज्ये, शेती आणि उद्योग, ज्ञान आणि संस्कृती या त्याच्या केवळ भौतिकतेच्या खूणा नव्हेत तर त्या त्याची नित्यतेची आस व संभवनीयताही प्रकट करतात. ह्या नित्यतेमुळेच माणसाच्या संकल्प स्वातंत्र्याला अर्थ प्राप्त होतो. ही नित्यताच माणसाला प्रयोगशील व प्रयत्नवादी बनवते. त्याच्या कर्तबगारींस व सिद्धीस अवकाश उपलब्ध करून देते. या अवकाशातच माणूस आपला भूतकाळ न्याहाळतो, त्यापासून शिकतो, प्रेरणाही घेतो. वर्तमानाला आशय बहाल करतो. भविष्याचा वेध घेतो. नवी नाती, नवे सामाजिक संबंध, नव्या संस्था, नवे ज्ञान-विज्ञान, नवी विचार दर्शने व त्या आधारे नव-समाज-निर्मितीचे प्रकल्प संकल्पितो व राबवतो. माणसाला उपलब्ध होणाऱ्या या अवकाशाचे भान *'नवभारत'*ने सतत जागविले. म्हणूनच त्यास परंपरेचा ना कधी काच जाणवला ना नवमताचा धसका. नित्य आणि अनित्यतेच्या द्वंद्वामध्ये जे सत्त्वरूपाने शिल्लक रहाते ते 'सातत्य' असते आणि हे सातत्य परंपरा आणि नवतेचा मिलाप असतो. ते परंपरेचे 'ओझे' स्वीकारीत नाही तर पारंपारिकतेला नवता-सन्मुख करते. ते नवतेने भाराहुन जात नाही, हरखून जात नाही वा खचूनही जात नाही, तर ते नवतेच्या नजरेला नजर भिडवते. तिची पारख करते. चिकित्सा करते आणि पारंपरिकतेच्या सत्त्वाशी नवतेची गाठ मारते. यातून परंपरा प्रवाही होते व नवता उपरी न राहता रुजू लागते, वाढते, विस्तारते व समाजाशी एकरूप होते. समाजाला कळतही नाही की आपण कात कधी टाकली. आपल्याला नवजीवन कसे प्राप्त झाले. हा सारा द्वंद्वात्मक विकासाचा परिपाक असतो. *'नवभारत'*ने या द्वंद्वात्मक विरोधविकासाचा खडासूर जरी कधी लावला नसला तरी त्याबाबतची आपली संवेदनक्षमता कधीच लपवली नाही. म्हणूनच मूळ मार्क्सच्या तत्त्वज्ञानातील विचार-संकल्पनांबरोबरच रॉयवादापासून ते कॉ. शरद् पाटील प्रणित 'मार्क्सवाद-फुले-आंबेडकरवादा' पर्यंतच्या *मार्क्सप्रेरित* विचारदर्शनांची चर्चा *'नवभारत'*ने आस्थेने केल्याचे दिसून येते. मार्क्सच्या द्वंद्वात्मक विरोधविकासवादाच्या कुऱ्हाडीने नवजात विचारांची भृणहत्या करणाऱ्या पोथीनिष्ठ मार्क्सवाद्यांनी द्वंद्वात्मक विकासातील संयोगावस्थेचा (synthesisi) खातमा जेंव्हा जेंव्हा केला तेव्हा तेव्हा पोथीनिष्ठ द्वंद्वात्मक विरोधविकासाच्या तत्त्वाचे प्रसंगी खंडन करीत समाजातील विरोध-विकासात्मक गतितत्त्वाकडे अधिक स्वागतशीलतेने पहाणारी व त्यातील संयोगावस्थेचे महत्त्व अधोरेखित करणारी *'नवभारत'*कारांची संवेदनक्षमता मार्क्सवादी विश्लेषण पद्धतीची बूज राखण्यास खचितच सहाय्यभूत ठरली हे विसरून चालणार नाही.

*'नवभारत'*च्या संपादकांची वैयक्तिक विचारसरणी काहीही असली तरी विचार-भिन्नतेचे अस्तित्व व वैविध्य मानणारी विचार-सहिष्णुता व उदारतेची कास त्यांनी सहसा न सोडण्यानेच हे विचारमंथन, प्रसंगी आरोप-प्रत्यारोपाच्या लाटा उसळतही चालूच राहिले. याचे कारण *'नवभारत'*कारांची लोकशाही निष्ठा ही लोकशाही शासनप्रणालीपुरती मर्यादित नसून ती जीवनव्यापी आहे. भिन्न भिन्न मूल्यांचे संरक्षण व संवर्धन, विचारांचे स्वातंत्र्य व व्यक्तिची प्रतिष्ठा ही या प्रकारची, लोकशाही जीवननिष्ठा अंगी बाणवल्याशिवाय आश्वस्त होत नाही. ही *'नवभारत'*कारांची विचार-निष्ठा असल्यामुळे आजवर मानवी जीवन व प्रगतीला आधारभूत ठरणाऱ्या मूल्यांची कास *'नवभारत'*ने सोडली नाही व पुढेही सोडण्याची गरज नाही. *'नवभारत'*चा हा शाश्वत वारसा आहे. तो समर्थपणे, सातत्याने पेलण्यास *'नवभारत'*कार क्वचित व्यक्तिशः कमी पडले असतील, प्रसंगी यासंदर्भात त्यांचेकडून लोकांच्या अपेक्षांचा भंगही झाला असेल वा काहींच्या कसोटीला ते शंभर टक्के उतरलेली नसतील! तरीही आपल्या घोषित उद्दिष्टांपासून त्यांनी कधी फारकत घेण्याचा प्रयत्न केला नाही. माणसे बदलली. काळ बदलला. संदर्भ बदलले, पिढ्या सरल्या तरी नवसमाजधारणेला आवश्यक असणाऱ्या

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मानवी मूल्यांच्या आधारेच *'नवभारत'*ने अर्धशतकाची वाटचाल, अनेक चढ-उतारांतून चालूच ठेवली. *'नवभारत'*ची ही मूल्यात्मक धारणा हीच त्याची शाश्वत ओळख आहे. या मूल्यांना साकारणे हे त्याचे प्रयोजन आहे. त्या दृष्टीने व त्या दिशेने पुढे सरकणे हा त्याचा संकल्प आहे. *'नवभारत'* च्या वैचारिक सातत्याचे अंतःश्रोत या मूल्यांच्या जोपासनेमध्ये आहेत.

**मूल्यांची संदर्भ सापेक्षता**

पण स्थिरता, सातत्य, मूल्यांची शाश्वतता म्हणजे साचलेपण, साकळलेपण अथवा स्थितित्व नव्हे. मूल्यं जतन करणे म्हणजे त्यांवर एकाच एक अर्थाची पुटे चढवणे नव्हे; किंवा बदलत्या संदर्भाची दखल न घेता त्यांतील सत्त्व उपेक्षून त्यांचे अक्षररूप कलेवर सांभाळणेही नव्हे. मूल्यांशी बांधिलकी आणि जोपासना म्हणजे ज्यामुळे त्यांना 'मूल्य' प्राप्त होते त्या सत्त्वाचे रक्षण आणि संवर्धन करणे होय. मूल्यांचे सत्त्वपोषण परिस्थितीतून होत असते. परिस्थितीचे बदलते संदर्भ मूल्यांना आशयघन आणि अर्थसंपन्न करीत असतात. म्हणूनच मूल्यांचे अर्थ विस्तारतात, त्यांचा विकास होतो हे आपण पहातो, अनुभवतो. स्वातंत्र्य, समता, न्याय, अहिंसा इ. मूल्यांचा विकास कालौघात कसा होत गेला हे आपल्या परिचयाचे आहे. *'नवभारत'* मधील लिखाणातून मूल्यांची ही संदर्भ-सापेक्षता नेहमीच अधोरेखित होत गेल्याचे दिसते; म्हणूनच *'नवभारत'*कारांना रूळून रूळून, सवयीने गोठू पहाणाऱ्या अनेक मूल्य-संकल्पनांची, कधी त्यांच्या मूळ रूपाच्या संदर्भात तर कधी विद्यमान परिस्थितीच्या संदर्भात पुनर्मांडणी व पुनर्रचना करावी वाटली. धर्मनिरपेक्षता, हिंदुत्व, पुरोगामित्व, समताधिष्ठित समाज, आधुनिकता या सारख्या मूल्य-कल्पनांची गेल्या दशक दिड-दशकांतील *'नवभारत'*मधील चर्चा याची साक्ष देते. *'नवभारत'*कारांनी या मूल्य-संकल्पनांचा केलेला उहापोह त्या मूल्यांविषयीच्या अनेक पारंपरिक, रूढ, घट्ट अशा धारणांना छेद देणारा, क्वचित त्या मूल्यांविषयीचं काहींच्या मनात संदेह निर्माण करणाराही होता. पण तो त्या मूल्यांच्या विरोधात नव्हता, त्यांचा उच्छेद करणारा तर नव्हताच नव्हता. कृतीच्या बाबत अधुपणा व मूल्यांच्या बाबतीत हळवेपणा जोपासणाऱ्या काही मंडळींना मात्र हा खटाटोप म्हणजे त्या मूल्यांच्या विरोधात उघडलेली ती आघाडीच वाटली. विचार-सरणीचे पातिव्रत्य सांभाळण्यासाठी व त्या त्या राजकारणाच्या गरजेचा भाग म्हणून ज्यांनी *'नवभारत'*कारांनी उपस्थित केलेल्या प्रश्नांची उपेक्षेने वा चाकोरीबद्धरीतीने दखल (?) घेतली त्यांची कृती एकवेळ समजण्यासारखी आहे. पण कृतिशील राजकारणाचे ओझे ज्यांच्या खांद्यावर नव्हते व नाही त्यांनी अशा चर्चांना प्रतिसाद देण्यास हरकत नव्हती. पण 'ओठावरील प्रचाराचे' सामर्थ्य हे विरोधी (!) राजकीय विचारसरणीचा प्रतिवाद करण्याच्या कामी तत्त्वचर्चेपेक्षाही प्रभावी व हुकूमी असल्याचा प्रत्यय असलेल्यांकडून हीही अपेक्षा अनाठायी न ठरली तरच नवल. परिणामतः *'नवभारत'*कारांच्या मांडणीतून उपस्थित होणाऱ्या प्रश्नांची व मुद्यांची चर्चा एका बाजूला भाबडे उदारमतवादी व दुसऱ्या बाजूला नैष्ठिक हिंदुत्ववादी यांच्या परिघातच फिरत राहिली. *'नवभारत'*कारांचीच ती मर्यादा होती, असेही यासंदर्भात कोणी म्हणू शकेल; किंबहुना ती तशी असेलही. पण चर्चेबाबतचे औदासिन्य वा असहकार हा अप्रत्यक्षपणे फॅसिस्ट प्रवृत्तींना रान मोकळे सोडतो, ही अधिक गंभीर बाब आहे; आणि कळत न कळत ज्यांच्याहातून हे प्रमाद घडतात त्यांची निर्दोष म्हणून सुटका कशी करावी?

या साऱ्याचा येथे निर्देश करण्याचा मुख्य हेतू हा *'नवभारत'*कारांच्या मांडणीचे महत्त्व अधोरेखित करणे हा नसून त्या मागील त्यांच्या दृष्टीचे स्पष्टीकरण करणे हा आहे. मूल्यांना परिस्थिती सापेक्ष संदर्भ व अर्थ प्राप्त होतात. अशा वेळी संबंधित मूल्यांची पुनर्चिकित्सा वारंवार करावी लागते. ती करताना आपापल्या मूळ धारणाही तपासण्याची, गरजेनुसार त्याचा अर्थ नव्याने सांगण्याची जरुरी असते. हा मूल्य-उच्छेद नसतो तर मूल्य-विकास असतो. हिंदुत्व, धर्मनिरपेक्षता, पुरोगामित्व इ. शब्दांचे पारंपरिक अर्थ बदलत आहेत. बहुजन, जमातवाद, मूलतत्त्ववाद, विषमता जातिवाद या प्रश्नांना बहुविध आयाम प्राप्त होत आहेत. वर्गसंघर्ष, व्यवस्था-परिवर्तन, क्रांती, विकास, या प्रक्रिया अधिकाधिक गुंतागुंतीच्या बहुआगामी व नवनवीन पेचांना जन्म देणाऱ्या झालेल्या आहेत. त्यांचे आकलन रूढ चौकटीतून होऊ शकत नाही. त्यांचे विश्लेषण रूढ सिद्धांताद्वारे होऊ शकत नाही. परिस्थिती व विचारांच्या या बदलत्या काळात *'नवभारत'*ने शिरोधार्य मानलेल्या मूल्यांचे जतन करावयाचे असेल तर त्यांच्या संदर्भ सापेक्ष अर्थांची उपेक्षा करून चालणार नाही, त्याच बरोबर त्यांचे निःसत्त्वीकरणही होता कामा नये. धर्मनिरपेक्षतेचा टाहो धर्मनिरपेक्षता वाढविण्या-ऐवजी विरोधाभक्तीने धर्मवाद पोसत असेल किंवा जातिनिर्मूलनाचे लढे जातींची अस्मिता व ओळख घट्ट करण्यामध्येच परिवर्तीत









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होत असतील; अथवा उलट्या बाजूने, राष्ट्रवाद हा जमातवादात परिवर्तित होत असेल किंवा विकास प्रकल्प पर्यावरण उद्धस्त करीत असतील आणि माणसांचे जथेच्या जथे परिघावर ढकलले जात असतील, राष्ट्रीय सुरक्षिततेच्या नावाखाली माणसांचे लष्करीकरण व शस्त्रांचे अतिरेकी अण्विकरण होत असेल, लोकशाहीच्या नावे लोकानुरंजनवाद पोसला जात असेल तर राष्ट्रवाद, लोकशाही, राष्ट्रीय सुरक्षितता, विकास यांचे संदर्भसापेक्ष अर्थ प्रश्नांकित करावे लागतील. तसेच जातिनिर्मूलन, धर्मनिरपेक्षता, समता, स्त्रीमुक्ती, यांचे *सत्त्वलक्ष्यी* व *मुक्तिदायी अर्थ* अधोरेखित करावे लागतील. मूल्यांच्या संदर्भ सापेक्षतेच्या बाबत *'नवभारत'* पुढील हे आव्हान मोठेच आहे. हे पेलायचे झाले तर १९८० च्या दशकानंतर, एकाबाजूला जागतिकी करण्याच्या समर्थनार्थ उदयास आलेले नवउदारमतवादाचे तत्त्वज्ञान; त्याचे स्वरूप व विश्लेषण; पूर्व युरोप व रशियातील साम्यवादाच्या ऱ्हासानंतर डाव्या वर्तुळात होत असलेले समाजवादा-बाबतचे विचारमंथन; स्त्रीवाद आणि पर्यावरणवाद या दर्शनांनी दिलेली नवी जीवनदृष्टी व विश्वविषयक दृष्टीकोन; शेतकरी चळवळी; स्त्रियांच्या चळवळी, दलित-बहुजनांच्या चळवळी, विद्यार्थी चळवळी, प्रकल्पग्रस्त विस्थापितंच्या चळवळी, पर्यावरणवादी व पर्यायी विकासाच्या चळवळी इ. नव्या सामाजिक चळवळींनी केलेली प्रचलित राजकारणाची परखड समीक्षा; तसेच मानवी अधिकार; भ्रष्टाचार निर्मूलन, अंधःश्रद्धानिर्मूलन, सामाजिक न्यायाचे प्रश्न, जागतिकशांतता व अण्वस्त्रविरोध, शिक्षण व आरोग्य या विषयांभोवती संघटित झालेल्या एकप्रश्नी चळवळींनी पुढे आणलेले प्रश्न या सर्वांचा सातत्याने वेध घ्यावा लागणार आहे. त्यांची त्या त्यावेळची प्रस्तुतता वा अ-प्रस्तुतता स्पष्टपणे सांगावी लागणार आहे.

विचारांचा विकास हा केवळ नवनवीन अभ्यासविषयक दृष्टिकोण किंवा सैद्धांतिक चौकटींच्या अंगानेच होत नसतो. 'लाईफ इज लार्जर दॅन थिअरी' असे निक्षून सांगणाऱ्या मार्क्सचे या संदर्भात विस्मरण होता कामा नये. गांधीवाद नावाचा कोणताही वाद नाही असे म्हणणाऱ्या गांधींनाही या 'लार्जर लाईफ'चे वास्तव अधोरेखित करायचे होते. म्हणूनच सिद्धांत कितीही सकस असोत, अभ्यासक कितीही प्रतिभासंपन्न, कुशाग्र बुद्धीचे, समर्पितवृत्तीचे व अफाट आकलन-क्षमतेचे असोत, परिस्थितीच्या रेट्यातून गतिमान होणारे मानवी जीवन व त्याला सामोरे जाताना सामान्य माणसांना येणारे साक्षात अनुभव हे कोणती सत्ये प्रकट करतील, त्या सत्याच्या प्रकाशात ते प्रचलित विचार, सिद्धांत, समजूती यांना कसा व कोणता प्रतिसाद देतील व त्यातून कोणते वर्तन प्रकार उद्‌भवतील हे एका मर्यादेनंतर ठामपणे सांगणे अशक्य असते. पण तरीही त्या मर्यादेत राहून अशा मानवी प्रतिसादांचा व वर्तनप्रकारांचा आस्थेने वेध घेत प्रचलित सिद्धांतांची, विश्लेषक चौकटींची, विचार समजूतींची चिकित्सा व समृद्धीकरण करावे लागते. त्यासाठी समकालीन विचारांचीच नव्हे तर समकालीन समस्यांचीही दखल घ्यावी लागते. त्या समस्यांचा उगम कशात आहे, त्यांचे स्वरूप काय आहे, त्यांची तीव्रता किती आहे, त्यांचे समाजावरील नजिकचे व दूरगामी परिणाम कोणते होणार आहेत, या प्रश्नांची सोडवणूक करण्याचा मार्ग कोणता यांची साधक-बाधक चर्चाही सातत्याने होणे गरजेचे आहे. त्या दृष्टीने समकालीन विचार व सिद्धांताबरोबरच समकालीन प्रश्नांचा वेध घेणारे, त्यांचे विश्लेषण करणारे लेखन हे *'नवभारत'चे* एक उदिष्ट राहील. त्यामध्ये निव्वळ शैक्षणिक क्षेत्रातील अभ्यासकच नव्हेत तर विविध क्षेत्रांत कार्यरत असलेल्या व्यक्ती व संघटना तसेच धोरणकर्ते (Policy-Makers) हे आपापल्या परिप्रेक्ष्यांसहीत संबंधित प्रश्नांचे आकलन व विश्लेषण समृद्ध करतील अशी उमेद *'नवभारत'* बाळगून आहे.

त्या दृष्टीने *'नवभारत'* हे केवळ अभ्यासकांचे नव्हे तर 'अभ्यासू प्रबोधकांचे' नियतकालिक व्हावे ही अपेक्षा आहे. ही अपेक्षा व्यक्त करतानाच अभ्यासाची शिस्त म्हणजे अभ्यास-पद्धतींचा व सैद्धांतिक चौकटींचा काच व संदर्भांचे ओझे नव्हे, किंवा त्यांचा धाकही नव्हे. तसेच विश्लेषक संकल्पनांचा साम्राज्यवादही नव्हे. तर हेत्वारोप, शेरेबाजी, व अभिनिवेशापासून आपली मांडणी मुक्त असणे ही अभ्यासपूर्वक लिखाणाची आद्य खूण आहे. *'नवभारत'* मध्ये सातत्याने लिहिणारे ज्ञात अभ्यासक व अन्य काही सन्माननीय अपवाद वगळता *'नवभारत'*कडे येणारे बरेचसे लिखाण सध्यातरी या कसोटीस फारसे उतरत नाही. परिणामतः सैद्धांतिक ठामपणाच्या जागी अभिनिवेश, साक्षेपी समीक्षेच्या जागी शेरेबाजी, व मतांच्या खंडन-मंडनाच्या जागी व्यक्तींचे खंडण-मंडण होऊ लागते. अशा लिखाणांपासून चार हात दूर रहाणेच *'नवभारत'* पसंत करील. मात्र अभ्यासाची शिस्त सांभाळून केलेल्या लिखाणाचे *'नवभारत'* सदैव स्वागतच करील.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**'*नवभारत*'चा अवकाश**

आज मराठी वैचारिक मासिके व नियतकालिकांचा पसारा खूपच वाढला आहे. या सर्व पसाऱ्यात *'नवभारत'* सारख्या नियतकालिकाचे नेमके स्थान व भूमिका कोणती असा प्रश्न या ठिकाणी उपस्थित होऊ शकतो. या प्रश्नाला थेट भिडून प्रतिसाद दिल्याशिवाय आजच्या मराठी विचार विश्वामधील *'नवभारत'*चा अवकाश स्पष्ट होणारा नाही. म्हणून या मुद्याचाही थोडासा उहापोह व्हायला हवा.

समकालीन मराठी विश्वात आज एका बाजूला 'समाज प्रवोधन पत्रिका', 'विचारशलाका', 'अंतर्नाद', 'सत्याग्रही विचारधारा' या सारखी प्राधान्याने वैचारिक-संवाद व चर्चा करणारी नियतकालिके आहेत तर दुसऱ्या बाजूला, 'साधना', 'मिळून साऱ्या जणी', 'बायजा', 'प्रवाही', 'परिवर्तनाचा वाटसरू', 'परिसर वार्ता', 'विवेक', 'पुरोगामी सत्यशोधक', 'हाकारा', 'एकता' या सारखी विशिष्ट सामाजिक/राजकीय प्रश्नांना, उद्दिष्टांना वाहिलेल्या नियतकालिकांचा प्रपंच दिसतो. या नियतकालिकांतूनही प्रत्येकाच्या सामाजिक राजकीय परिप्रेक्ष्यांतून वैचारिक प्रवोधन त्या त्या अंगाने चालूच राहते. तिसरी कडे 'अनुष्टुभ', 'अस्मितादर्श', 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका', 'ललित' 'पंचधारा' या सारख्या प्रामुख्याने मराठी साहित्याची वार्ता करणाऱ्या नियतकालिकांचा व्याप दिसतो. तर चौथ्या बाजूला 'अर्थबोध', 'परामर्श', 'मराठी संशोधन पत्रिका', 'भाषा आणि जीवन', 'राज्यशास्त्र पत्रिका', 'भारत इतिहास संशोधन पत्रिका' या सारख्या त्या त्या विद्याशाखांना वाहिलेल्या नियतकालिकांचा वावर दिसतो. या व्यतिरिक्त दैनिक वृत्तपत्रसंस्थांच्या कुशीत जन्मास आलेली 'साप्ताहिक सकाळ', 'लोकप्रभा' या सारखी प्रचंड खपाची व आपली एक वेगळी ओळख सांगणारी नियतकालिकेही आहेत. शिवाय निव्वळ मनोरंजन नव्हे तर सकस वैचारिक व प्रसंगी संशोधनपर लिखाणांना वाव देणाऱ्या वार्षिक दिवाळी अंकांचेही एक मोठे विश्व मराठी सारस्वतात आपला प्रवाह शाबूत ठेवून आहे. या सर्व पसाऱ्यात *'नवभारत'*ला अवकाश गवसतो तो निव्वळ त्याच्या ज्येष्ठत्वाच्या आधारावर नसून त्याने आजवर बजावलेल्या 'विचारकाच्या' भूमिकेमुळे.

मराठी विचार विश्वात एकोणीसाव्या शतकातील प्रबोधनकाळा पासून ते स्वातंत्र्योत्तर काळातील गं.बा. सरदार, श्री.म. माटे, पु.ग. सहस्त्रबुद्धे व दि.के. बेडेकर, मे.पुं. रेगे, शरद् पाटील, वसंतराव पळशीकर, आ.ह. साळुंके, रावसाहेब कसबे यांच्यापर्यंत, निव्वळ अभ्यासक, संशोधक विद्वानांचा नव्हे, तर अभ्यास व समाज यांच्यातील एक कळीचा दुवा म्हणून समर्पित वृत्तीने वैचारिक व प्रत्यक्ष क्षेत्रात काम करणारा, 'विचारवंत' नावाने मान्यता पावलेला एक प्रवाह वहाताना दिसतो. विद्याशाखीय तज्ज्ञ तसेच त्या त्या विद्याशाखांतील संशोधकांपेक्षा, बुद्धीजीवी वर्गातील हा विचारवंत वर्ग ज्ञान व्यवहाराच्या क्षेत्रात व प्रबोधन कार्यात एक वेगळी पण महत्त्वाची भूमिका बजावत आला आहे. त्याला भिन्न भिन्न विद्याशाखांचे, ज्ञानाच्या क्षेत्रातील योगदान परिचित होते. अनेक विद्याशाखांतील ज्ञानव्यवहार करण्याची त्याची क्षमता असे पण तरीही त्याने आपले विचारक्षेत्र त्या त्या विद्याशाखीय अभ्यासांपुरते सीमित ठेवले नाही. एखाद्या विद्याशाखेतील विशेषज्ञ ही भूमिका बजावण्यापेक्षा विविध क्षेत्रांतील विशेषज्ञता मानवी जीवनात अधिकाधिक प्रकट होऊन ते जीवन उत्तरोत्तर ज्ञानसंपन्न, सदभिरुचीसंपन्न व निकोप कसे होईल याची चिंता वहाण्याचे व्रत घेणे त्यांनी पसंत केले. त्यांनी आपली विचारशक्ती, प्रतिभा व कार्यशक्ती त्या साठी वेचली. एका बाजूला समाजातील विविध चळवळी व आंदोलनातून येणारे अनुभव, त्यातील ज्ञानदृष्टी त्यांनी विद्याशाखांचा कस वाढविण्याच्या कामी वापरली तर दुसऱ्या बाजूला या विद्याशाखां व त्यातील ज्ञान प्रवाहास सर्वसामान्य जनतेपर्यंत वस्तुनिष्ठपणे व सच्चेपणाने नेण्याचे व्रतही त्यांनी अंगिकारले. हे व्रत ना त्यांच्या 'इंटेलेक्च्युअल करिअरिझमचा' भाग होता, ना ती त्यांच्या विद्याशाखीय अभ्यासातील व्यक्तिगत व्यावसायिक निकड होती. मराठी माणसाच्या वैचारिक प्रबोधनाच्या तळमळीने केलेला तो एक ज्ञाननिष्ठ प्रबोधन व्यवहार होता. या व्यवहाराची एक अभिव्यक्ती म्हणजे *'नवभारत'* सारखी नियतकालिके होत.

१९८० च्या दशकानंतर भारतात आणि साऱ्या जगभर 'अस्मितेच्या' आणि 'वेगळेपणाच्या' राजकारणाचे पर्व अवतरल्यानंतर उपरोक्त ज्ञान-निष्ठ प्रबोधन व्यवहाराचे स्थान काय राहील? तो आपली प्रस्तुतता कितपत टिकवू शकेल? विद्यमान संदर्भात त्याचे मोल काय? या सारखे प्रश्न अर्थात आहेतच. त्यांची केवळ नोंद घेऊन भागणार नाही तर ते स्पष्टपणे उपस्थितच केले पाहिजेत. कारण याच प्रश्नांच्या प्रकाशात *'नवभारत'* सारख्या नियतकालिकांना उद्याच्या कार्याची दिशा व अवकाश प्राप्त होणार आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**ज्ञानाची दमनकारी शक्ती व मुक्तिदायी वापर**

अज्ञाताचा वेध घेत ज्ञाताचा परीघ विस्तारणे हेच माणसाच्या ठायी उतरलेल्या विचारशीलतेची खूण आहे. म्हणूनच जोवर माणूस त्याच्या विचारशीलतेसहित शाबूत आहे, तोवर त्याचा हा ज्ञानासाठीचा प्रवास निरंतर चालूच राहणार व त्यासाठी ज्ञाननिष्ठ प्रबोधनाची गरज भासणारच. पण ज्ञानाचे रूप, आशय आणि प्रयोजन स्थल-कालपरत्वे बदलतच असते. ब्रह्मज्ञान-आत्मज्ञानापासून ते माहिती तंत्रज्ञानापर्यंत ज्ञानाची बदलत आलेली रूपे आजवर आपण पाहिली आणि अनुभवली. त्याचे समाज जीवनावरचे भले-बुरे परिणामही आपण भोगले व सोसले. वाढत्या ज्ञानाबरोबर सृष्टीची, मानवी समाजाची व मानवी मनाची व्यमिश्रताच उत्तरोत्तर प्रकटही झाली व ज्ञाताच्या कक्षेतही आली. पौर्वात्य अध्यात्मविद्या व पाश्चिमात्य प्रबोधनाचा दार्शनिक टकराव आणि संघर्षही आपण अनुभवला आणि या दोन दार्शनिक छापण्यातील संवाद आणि सहयोगाचा अवकाशही फ्रिल्जो काप्रा सारख्या पदार्थवैज्ञानिकापासून ते विज्ञान आणि अध्यात्माचा अनुबंध सांगणारे विनोबा, बुद्ध, लाओत्से, सूफी, पतंजली आणि शाक्तांच्या ध्यान मीमांसेचा मेळ पाश्चात्य फ्रॉईड, ज्युंगच्या मनोविश्लेषणाशी घालणारे रजनीश किंवा संघटनात्मक मानवाच्या कार्यक्षमतेचा वेध घेऊन अग्रक्रम निर्धारण किंवा काल नियोजन हे यशस्वी व्यवस्थापनाचे गमक नसून शील नियोजन व स्वत:वरील नियंत्रण (पर्सनल व्हिक्टरी) हेच यशस्वी व्यवस्थापनाचे गमक आहे असे सांगणारे स्टिफन कोवी सारखे व्यवस्थापन गुरू दाखवित असल्याचे आपण पहात आहोत.

ज्ञानाच्या या उपलब्धीमुळे व्यक्ती आणि सृष्टी तसेच व्यक्ती आणि समष्टी यांच्यातील परस्पर संबंधांचे कितीतरी आयाम आज आपल्याला ठाऊक झाले आहेत. हे सर्व आयाम ध्यानात घेऊन किंवा किमानपक्षी त्यांचे भान ठेवून व्यक्ती आणि सृष्टी तसेच व्यक्ती आणि समष्टीच्या बदलत्या संबंधांचा अधिक समग्रपणे वेध घेणे आता शक्य झाले आहे. ही प्रक्रिया अर्थातच एखाद्या समाजनिरपेक्ष अवकाशात सुरू होणार नाही तर ती समाजांतर्गत व्यवहारांतून तसेच समाज व्यवस्थांच्या उलथापालथीतूनच पुढे सरकणार आहे. या उलथापालथी घडत असताना प्रस्थापित वर्ग आणि व्यवस्थेकडून उपलब्ध ज्ञानाचा दमनात्मक वापर केला जाण्याची शक्यता जितकी दाट आहे. तितकाच नवजागृत जन-समूहाकडून या ज्ञानाचा मुक्तीदायी वापर होण्याची संभाव्यता अकारण उपेक्षून चालणार नाही. किंबहुना या ज्ञानाचा मुक्तीदायी वापर नवजागृत जनसमूहांच्या हितार्थ कसा होईल या बाबतचा विचार *'नवभारत'*ला करावा लागणार आहे. तो, अर्थात, नुसताच अशा समुहां*साठी* करावयाचा नसून तो त्यांच्या *समवेत* करायचा आहे. इतकेच नव्हे, तर तो त्यांच्या वैचारिक हस्तक्षेपाची उमेद वाढवत आणि त्यांच्या द्वाराच करायचा आहे.

**ज्ञानोपलब्धीच्या संदर्भात दलित - बहुजन समूहांची वंचना**

हे कार्य अर्थातच अवघड आहे. कारण भारतातील जातिव्यवस्थेच्या अडसरामुळे आणि वसाहतवादाच्या आघाताने नवजागृत जनसमुहांचा एतद्देशीय ज्ञानपरंपरांशी कोणताच संपर्क राहू शकला नाही. इंग्रजांनी शिक्षण सर्वांना खुले केल्यानंतर पश्चिमी प्रबोधनाची ज्ञानपरंपरा या समुहांच्या संपर्काधीन झाली. त्याचा लाभ घेत या समुहांतील काही व्यक्तींचे वा गटांचे सक्षमीकरण झाले. पण त्याच बरोबर सक्षमीकरणाचा एकमेव राजमार्ग म्हणजे पश्चिमी प्रबोधनाचा अनुवाद असे समीकरणही न कळत तयार झाले. हे समीकरण सर्वस्वी चुकीचे नव्हते. पण ते एकारलेले होते. या एकारलेपणातून आधीच संपर्काबाहेर राहिलेल्या एतद्देशीय ज्ञानपरंपरांची उत्तरोत्तर उपेक्षाच होत गेली. इंग्रजीच्या संपर्कामुळे उपलब्ध झालेली पश्चिमी प्रबोधनाची ज्ञान परंपरासुद्धा या जनसमुहांच्या वाट्याला सर्वस्वी येऊ शकली नाही कारण या जनसमुहातील सर्वांनाच इंग्रजी शिक्षण उपलब्ध होऊ शकत नव्हते. त्यांचा तुटपुंजा शिक्षण व्यवहार हा भारतातील त्यांच्या त्यांच्या मातृभाषेतूनच होत राहिला. या मातृभाषांतून पश्चिमी प्रबोधन जेवढे झिरपले त्यावरच त्यांना समाधान मानावे लागले.

वास्तविक पश्चिमी प्रबोधनाची ज्ञानपरंपरा मोठ्या प्रमाणात आपापल्या मातृभाषेत आणण्याची, तसेच जातिव्यवस्थेतील स्थानजन्य लाभामुळे संपर्काधीन असलेल्या, एतद्देशीय संस्कृत, पाली व प्राकृत ज्ञानपरंपरांना आपापल्या अर्वाचीन मातृभाषेत उतरवण्याची प्रधान जबाबदारी, इथल्या ज्ञानाचा वारसा लाभलेल्या तथाकथित उच्चजातींचीच होती. स्वातंत्र्यपूर्व काळात अशा जातीतील काही मंडळींनी या दिशेने अथक प्रयत्न केले हेही खरे. पण यातील बरेचसे प्रयत्न हे एक तर या मंडळींच्या अभिजनभानातून झाले किंवा राष्ट्रीय स्वातंत्र्य चळवळीची गरज म्हणून झाले. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर अशा प्रयत्नांना ओहोटीच लागली. स्वातंत्र्योत्तर काळात संस्थात्मक पातळीवर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ही जबाबदारी प्रादेशिक विद्यापीठांना उचलता आली असती. पण जबाबदारी उचलणे तर सोडाच ही दृष्टीही प्रादेशिक विद्यापीठांनी दाखवली नाही. अशा वास्तवात असंख्य दलित-बहुजनसमूह हे पश्चिमी प्रबोधनाच्या ज्ञानपरंपरेशी परिचित होऊनही तिचा ठाव घेऊ शकले नाहीत.

आजच्या जागतिकीकरणाच्या लाटेच्या तडाख्यात एका बाजूला दलित-आदिवासी-भटके व अन्य बहुजन समुहांचे समुदायी जीवन व त्याअनुरोधाने त्यांनी जतन केलेल्या त्यांच्या त्यांच्या सांस्कृतिक परंपरा व पारंपारिक ज्ञान हेही आता एक तर लोप पावत चालते आहे किंवा सांस्कृतिक वेगळेपण उत्सवी पद्धतीने अधोरेखित करण्यासाठी त्यांचा आज भांडवली शक्तींकडून बहुसंस्कृतीवादाच्या (Multiculturalism) नावाखाली सर्रास वापर केला जात आहे. परिणामतः म. फुले सारख्या प्रतिभासंपन्न माणसास एतद्देशीय शूद्रादि-अतिशूद्रांच्या समुदायी संस्कृतीत राहून येथील शोषक वर्गावर आघात करीत पर्यायी संस्कृती देऊ करण्याचा जो सांस्कृतिक अवकाश उपलब्ध होता तोही जागतिकीकरणाच्या आघाताने पुसला जात आहे. स्वातंत्र्योत्तर काळातील अभिजनांची उदासीनता, प्रादेशिक विद्यापीठांनी गमावलेला महत्त्वपूर्ण अवकाश आणि जागतिकीकरणामुळे आक्रसत चाललेला सांस्कृतिक अवकाश यामुळे आज आपल्या सर्वांपुढेच उपलब्ध ज्ञानाचा मुक्तिदायी वापर करण्याच्या संदर्भात गंभीर अडचणी आहेत. चहुबाजूंनी वंचित राहिलेल्या दलित-बहुजन समाजापुढे तर त्या खूपच आहेत. या वंचनेमुळेच हे समूह जागृत होत आहेत. या जागृतीस आशयसंपन्न करणे हे *'नवभारत'*चे उद्दिष्ट असेल.

## भारतीय राष्ट्र-राज्यापुढील आव्हान

स्वातंत्र्योत्तर काळातील भारतीय राष्ट्र-राज्याने केलेल्या विकासाचा परिपाक म्हणून तसेच विसाव्या शतकाच्या ऐंशीच्या दशकात जगभर निर्माण झालेल्या लोकशाहीकरणाच्या तिसऱ्या लाटेमुळे भारतीय राष्ट्रीय समाजातील अनेक दबलेले, उपेक्षित, शोषित व पीडित जनसमूह जागे झाले आहेत. भारताच्या राज्यव्यवस्थेत व समाजजीवनात ते आपापला रास्त वाटा मागत आहेत. त्यांच्या सहभागाचे, आजिविकेचे, सांस्कृतिक ओळखीचे, शोषणमुक्तीचे, सुरक्षिततेचे अनेकविध प्रश्न भारतीय राष्ट्र-राज्यापुढे आहेत. नोकरशाही, लष्कर, राजकीयपक्ष, शिक्षण-व्यवस्था, संपर्क माध्यमे या सारख्या राज्यसंस्थेच्या रूढ संस्थात्मक साधनांद्वारा (स्टेट ॲपॅरेटस) वरील प्रश्नांचे व्यवस्थापन व अंशतः निराकरण करता येणे आजवर शक्य होते. पण खुद्द राष्ट्र-राज्य व्यवस्थेपुढेच जागतिकीकरणामुळे जे आव्हान उभे ठाकले आहे, त्यास संस्थात्मक प्रतिसाद कसा द्यावयाचा हा भारतीय राष्ट्रीय समाजापुढील खरा पेच आहे. या पेचावर काही ना काही तोडगा दृष्टिपथात आल्याविना अठरापगड जाती, असंख्य धार्मिक समूह, अनेक वंश-सांस्कृतिक गट व भांडवली विकासातून निर्माण झालेल्या असंख्य वर्गांचे राष्ट्रीय समूह म्हणून सहअस्तित्व टिकविणे जिकीरीचे आहे. कारण या सहअस्तित्वास बाहेरून आणि आतून हादरे बसत आहेत. या हादऱ्यांमुळे जर आपल्या राष्ट्रीय समूहाचे विघटन सुरू झाले तर सामाजिक न्यायाचे प्रश्न राष्ट्रीय प्रश्न म्हणून हाताळता येणार नाहीत. ते तुकड्या तुकड्यात विभागलेल्या जनसमूहांच्या निव्वळ अस्तित्वाचे प्रश्न बनतील. सामाजिक न्यायाचे आयाम गमावलेला कोणताही प्रश्न मग मुक्तिदायी, क्रांतिकारी राजकारणास प्रथम निरुद्देश्य आणि मग अशक्य बनवतो.

## राज्यकर्त्या वर्गाचा प्रतिसाद

आज प्रस्थापित राज्यकर्ता वर्ग उपरोक्त आव्हानास कसा सामोरा जातोय? या संदर्भात तो आपल्याला तीन मार्ग दाखवतोय. इतकेच नव्हे तर या मार्गांवरून वाटचाल करीत आपण हमखास यशस्वी होऊ या कल्पनाविलासात तो रमलेला आहे. यातील पहिला मार्ग म्हणजे उदारीकरण, खासगीकरण व जागतिकीकरणाची त्रिसूत्री सांगत मिश्र-अर्थव्यवस्थोत्तर भारतीय राष्ट्रीय समूहास बाजारपेठीय शक्तींच्या माध्यमातून संघटित करणे व बाजार पेठीय संस्थांच्या माध्यमातून त्यांची एकात्मता टिकवणे. दोन, जागतिक समुदायापुढे भारतीय ओळख सांगत पण भारतांतर्गत, हिंदु ओळख अधोरेखित करत भारतीय राष्ट्रीय समूहाचे हिंदुत्वीकरणाच्या द्वारा एकात्मीकरण साधणे, आणि तीन, जिथे हे मार्ग थिटे पडतील तेथे युवा पिढी पुढे २१ व्या शतकातील भारतीय महासत्तेचे (सुपर पॉवर) स्वप्न रंगवून, भारताला अणुशस्त्रसज्ज करीत लष्करी सामर्थ्य वाढविणे व लष्कर, पोलिस, सुरक्षा दले, दमनकारी कायदे या माध्यमातून राज्याच्या दंडशक्तीचा अधिकाधिक दमनकारी वापर करीत भारतीय राष्ट्रीय समूहाची एकात्मता टिकविणे. राष्ट्रीय एकात्मता टिकविण्याचे हे तिन्ही मार्ग भ्रममूलक व अदूरदर्शी आहेत.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बाजारपेठीय अर्थव्यवस्थेकडे आर्थिक समृद्धीची किल्ली(!) कदाचित असू शकते पण वाढत्या आर्थिक विषमतेवरील कोणताच तोडगा तिच्याकडे नाही. आज मुक्त अर्थव्यवस्थेच्या तडाख्यात सापडलेले तिसरे जग याच आर्थिक विषमतेमध्ये होरपळून निघत आहे. आणि विषमताग्रस्त समूहांच्या दुःखावर फुंकर घालण्यासाठी तेथे मूलतत्त्ववादी व दहशतवादी शक्ती सरसावत आहेत आणि या जनसमुहांचा ताबा घेत आहेत. याच बाजारपेठीय शक्तींनी साम्यवादी राजवटींचे दुसरे जग उध्वस्त केले. परिणामतः अनेक साम्यवादी राष्ट्र-राज्ये लयास गेली. याच बाजारपेठीय शक्ती पहिल्या जगासही मंदीचे तडाखे देत आहेत. तैवान, कोरीया इत्यादी 'आशियायी वाघांची' (Asian Tigers) काय अवस्था झाली हेही डोळ्यापुढे आहे. तेव्हा बाजारपेठीय शक्तींच्या सहाय्याने राष्ट्र-राज्यीय समूहांची एकसंधता साधणे हा भूलभुलैय्या आहे.

राज्यकर्त्यावर्गांमधील अनेक लोकांना हिंदुत्वीकरणाचा विचार हा राष्ट्र बांधणीचा पर्याय म्हणून स्वीकारावासा वाटतोय. हा पर्याय केवळ अपुराच नव्हे तर आत्मघातकीही आहे. कारण हिंदुत्वाच्या ॲजेंड्यामुळे भारतातील हिंद्वेतर समूह अधिकाधिक असुरक्षित व भयग्रस्तही बनत आहेत. परिणामतः ते आपापली भारतीय ओळख सांगण्याऐवजी धार्मिक वा वंश-सांस्कृतिक (एथूनिक) ओळख आग्रहाने पुढे आणत आहेत. दुसऱ्या बाजूला हा हिंदुत्ववाद भारताबाहेरील मुस्लिम, बौद्ध व ख्रिश्चन मूलतत्त्ववाद्यांनाही चेतावणी देत आहे. त्यामुळे सर्वधर्मीय सहअस्तित्वाची भारताची शतकानुशतकाची ओळख आतून आणि बाहेरून पुसली जात आहे. ही ओळख नुसतीच धार्मिक सहिष्णुतेची नाही तर ती सांस्कृतिक बहुलतेचीही आहे. ही बहुलता पुसण्याचा किंवा तिला साचेबंद करण्याचा प्रयत्न यशस्वी झाला तर समूहा-समूहांमधील परस्पर विश्वास, संवाद आणि देवाण-घेवाण हे राष्ट्रीय एकात्मतेचे अंतःस्त्रोत कसे शाबूत रहातील? तेच आटले तर एकात्मतेचे शाश्वत आधारच नष्ट होतील.

शेवटी बाब रहाते ती लष्करी सामर्थ्याच्या व पोलीसी बळाच्या सहाय्याने राष्ट्रीय समूहाला एकसंध ठेवण्याची. प्रत्येक राष्ट्र-राज्य कमी-अधिक प्रमाणात राष्ट्रीय एकात्मता टिकविण्यासाठी या बळाचा वापर करीतच असते व तो प्रसंगी करावाही लागतो. पण या बळाचा प्रयोग कायदा आणि सुव्यवस्था ठेवण्याच्या नावाखाली वारंवार होऊ लागला तर नागरी सत्तेच्या अधिकाराची विश्वासार्हता व अधिमान्यताच नष्ट होऊ लागते. दुसरी बाब म्हणजे कायदा-सुव्यवस्थेच्या नावाखाली वारंवार केला जाणारा लष्करी व पोलिस दलाचा वापर हा सामाजिक न्यायासाठी चाललेल्या संघर्षवादी राजकारणासही नख लावतो व अशा चळवळींची कित्येकदा भृणहत्याच करतो. अन्याय, शोषण होत असले तरीही त्याविरुद्ध संघर्ष करण्याचा हक्क जगता येणे हा केवळ पीडित समूहांचा निःश्वास नसतो तर तो मुक्तीदायी राजकारणाची संभाव्यता ही अधोरेखित करतो. नागरी सत्तेकडून होणारा दमनकारी कायद्यांचा वा लष्करी बळाचा वाढता वापर संघर्षवादी, मुक्तिदायी राजकारणाचा अवकाश कमी करत जातो. या मुक्तिदायी राजकारणाच्या अभावी समाज उमेद हरवून बसतो. बदलाची शक्यता नाकारू लागतो. त्यातून येणारी हताशता त्याला भयग्रस्त बनवते. मग एकतर तो फॅसिस्ट राष्ट्रवादाचा पोकळ पुरुषार्थ सांगू लागतो, किंवा मूलतत्त्ववादी धार्मिकतेचा आसरा घेतो. यातून त्याला सावरायचे असेल तर त्याची राष्ट्रीय ओळख वेगळ्या प्रकारे सांगावी लागेल. ती निःसंदिग्धपणे जात-धर्म-जमात-वंश निरपेक्ष असली पाहिजे. ती निव्वळ आंतरराष्ट्रीय समुदायाने मान्यता दिलेल्या वैधानिक सीमांच्या संदर्भातील रूक्ष प्रादेशिक ओळख नसावी, तर ती त्या समाजाच्या अंतर्गत चालत आलेल्या, सातत्यपूर्ण सांस्कृतिक संघर्ष व मंथनातुन साकार होणारी मूल्यनिष्ठ भावात्मक ओळख हवी. भारतीय स्वातंत्र्य आंदोलनाच्या काळात अशी ओळख साकारण्याचा प्रामाणिक प्रयत्न गांधी-नेहरूंनी केला. इतकेच नव्हे तर ती ओळखही साकारली. स्वातंत्र्यानंतरच्या-नव्या राज्यकर्त्या वर्गास ही ओळख पेलवली नाही म्हणून ती जगण्याच्या पातळीवर शंभर टक्के उतरली नाही. आणि १९८० नंतरच्या राज्यकर्त्या वर्गास तर ही ओळख पटेनाशीच झाली आहे. पण ही भावात्मक ओळख सांगतच एकविसाव्या शतकातील भारत एकसंघपणे उभा राहू शकतो व राष्ट्रीय समूह म्हणून समताधिष्ठित व शोषणमुक्त समाजाचे आनंदवनभुवन साकारू शकतो. या संकल्पाशी एकनिष्ठ राहून वैचारिक हस्तक्षेप करीत राहणे व त्यात नवजागृत समाजाच्या आकांक्षा, स्वप्ने व विचारांना व त्याहितैषी चिंतनास अवकाश उपलब्ध करून देणे ही *'नवभारत'*च्या आगामी वाटचालीची दिशा असेल. या संकल्पास सर्वांनी सर्वतोपरी हातभार लावावा व तो तडीस नेण्यास यथाशक्ती सहाय्यभूत व्हावे हेच नवभारतापुढील आव्हानांच्या संदर्भात *'नवभारत'*चे नम्र आवाहन आहे. ❑❑

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# मराठी वाङ्मयातील पारंपरिक विज्ञान*

श्री.मा. भावे

उपोद्घात

(अ) भारतीय संस्कृतीने अनेक विज्ञाने व तंत्रज्ञाने यांना जन्म दिला व कित्येकदा परकीय संस्कृतीतील संकल्पनांचा समावेश करत त्यांची जोपासना केली याबद्दल आता दुमत असू नये. भारतीय परंपरेप्रमाणे सर्वज्ञानाचे उगमस्थान वेद व वेदांगे हे आहे. त्यामुळे आरोग्य-विषयक जे ज्ञान वैदिकांनी गोळा केले त्याची साठवण त्यांनी 'आयुर्वेद' या सदराखाली केली. भारतीय विज्ञानांवरील ग्रंथ साहजिकच संस्कृत भाषेत आहेत. आज ज्यांना आपण राष्ट्रभाषा म्हणतो - परंतु ज्या वस्तुतः विभागीय भाषा आहेत - अशा बंगाली, गुजराथी, मराठी इ. भाषांचा उदय पुढे झाला असला तरी भारतीय विज्ञानांची भाषा संस्कृतच राहिली.

केवळ महाराष्ट्राविषयी बोलायचे झाल्यास असे म्हणता येईल की, इथे इंग्रजी राज्याची स्थापना होईपर्यंत भारतीय विज्ञानांविषयीचे लेखन संस्कृत भाषेतूनच झाले. हे शक्य आहे की, पाठशाळातून जे शिक्षण चाले त्यासाठी मराठी भाषेचा उपयोग होत असेल व उपपत्ती कित्येकदा मराठी भाषेतून दिल्या जात असतील. असे वाटण्याचे कारण हे की, केरळात गणितातील सूत्रांचे खुलासे देणाऱ्या मल्याळी पोथ्या सापडल्या. राजवाड्यांनी मराठी भाषेच्या इतिहासावरील आपल्या निबंधात म्हटले आहे की, मराठी ही जरी व्यवहाराची भाषा असली, तरी महाराष्ट्राची ज्ञानभाषा संस्कृतच होती. याची अनेक उदाहरणे देता येतील. भास्कराचार्य (१११४-११९३) हे ख्यातनाम ज्योतिषी महाराष्ट्रातले. पण त्यानी आपला ज्योतिषीवीणामय महान ग्रंथ *सिद्धान्तशिरोमणी* संस्कृतात लिहिला. गणेश दैवज्ञ हा १६ व्या शतकातला प्रसिद्ध ज्योतिषी. त्यावेळी मराठी भाषा चांगली प्रौढ झाली होती. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ यांनी मराठी भाषेला अमृताशी पैजा जिंकण्यापर्यंत प्रगल्भ रूप दिले होते. पण गणेश दैवज्ञाने आपला *ग्रहलायन* हा करणग्रंथ संस्कृतातच रचला. फार लांब कशाला, शिवाजी महाराजांनी करवून घेतलेला *राज्यव्यवहारकोश* संस्कृत भाषेतच आहे.

सारांश, पारंपरिक विज्ञानावर झालेले मराठी लिखाण पाहावयाचे झाल्यास त्याचा शोध १९ व्या शतकापासून घेतला पाहिजे. पण इथेही मराठी भाषेला अप्रतिहत प्रतिष्ठा मिळाली असे झाले नाही. संस्कृतचे महत्त्व ओसरले तरी तिच्या जागी इंग्रजी येऊन बसली. १८१८ पासून १८५४ पर्यंत इंग्रज सरकार दोन पर्यायांच्या दरम्यान घुटमळत होते. पहिला पर्याय असा की, पारंपरिक ज्ञान पारंपरिक पद्धतीने संस्कृत व मराठी भाषातून द्यायचे. याचे उत्तम उदाहरण म्हणजे इंग्रज सरकारने पुण्याच्या विश्रामबाग वाड्यात उघडलेली पाठशाळा. दुसरा पर्याय अर्थातच हा की, पाश्चात्य विज्ञान व साहित्य यांचा अभ्यास इंग्रजी भाषेतून करण्याची सोय करायची. अनेक वादविवादानंतर व या दोन टोकांमधल्या अनेक विकल्पांची चाचपणी केल्यानंतर, १८५४ साली वूडच्या खलित्यात वर सांगितलेला दुसरा पर्याय इंग्रजांनी स्वीकारला व इंग्रजीतून पाश्चात्य विज्ञान व साहित्य यांचे शिक्षण देण्यासाठी मुंबई विद्यापीठाची स्थापना केली.

(आ) हा इतिहास लक्षात घेता असे व्हायला हवे होते की, १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात व त्यानंतर भारतीय विज्ञानांचा अभ्यास व त्यावरील ग्रंथनिर्मिती बंद होणे आणि जी काही ग्रंथ-निर्मिती व्हावयाची ती इंग्रजीत होणे. पण असे सर्रास झाले नाही याची दोन महत्त्वाची कारणे आहेत. पहिले असे की, इंग्रजांच्या कारकिर्दीत काही अभ्यासू प्रशासकांनी भारतीय विज्ञानांच्या अभ्यासाची एक चळवळच उभी केली. नंतर इतर देशातील विद्वानांनीहि भारतीय विज्ञानांकडे लक्ष दिले. १८ व्या शतकाची अखेर व एकोणीसाव्या शतकाचा प्रथमार्ध मिळून पंचाहत्तर वर्षात विल्यम जोन्स, कोलब्रुक, एलनेअर बर्जेस वगैरे पाश्चात्य पंडितांनी येथील शास्त्री मंडळींस हाताशी धरून संस्कृत ग्रंथांचा सूक्ष्म व पद्धतशीर अभ्यास सुरू केला व आजही तो चालू आहे.

---

* तत्त्वज्ञान विभाग पुणे विद्यापीठ व साहित्य ॲकॅडेमी यांनी आयोजिलेल्या चर्चासत्रात वाचलेला निबंध





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या अभ्यासातून असे ध्यानात आले की, मिल्-मेकॉले इत्यादि राज्यकर्त्या विद्वानांनी भारतीय ज्ञानाची जी कठोर अवहेलना केली होती ती पूर्णपणे अस्थानी व निराधार होती. विज्ञान व तंत्रज्ञान यांच्या अनेक शाखांतून - उदा. तर्कशास्त्र, ज्योतिषशास्त्र, वास्तुकला, शिल्पशास्त्र - भारतीयांनी आश्चर्य वाटावे इतकी प्रगती केली होती. शेती, जनावरांची पैदास व जोपासना, धातूंचे एकीकरण व त्यांचे उपयोग, कापड विणणे, नक्षीकाम इत्यादि व्यवसायातील भारतीयांचे कौशल्य विनतोड होते. पाश्चात्यांनी या पूर्वी अमेरिकेतील मय व इंका या संस्कृतींशी आणि युरोप व आशिया यांच्या सरहदीवरील तुर्की, इराणी व अरबी संस्कृतींशी मुकाबला केला होता. पण त्या संस्कृतींपेक्षा भारतीय संस्कृतीचा आब गुणात्मक दृष्टीने वेगळ्या प्रतीचा होता.

भारतीय विज्ञानांच्या अभ्यासाला अशी प्रतिष्ठा मिळत असतानाच विद्यापीठातून पाश्चात्य विज्ञाने व समाजशास्त्रे यांचा अभ्यास केलेल्या पिढ्या बाहेर पडत होत्या. त्यांच्या मध्ये राष्ट्राभिमान ही भावना उत्कटत्वाने वसत होती व थोडक्याच काळात राष्ट्रवादी चळवळीला जोर चढला. प्राच्यविद्यांचा वर सांगितलेला अभ्यास राष्ट्रवादाच्या वाढीला मोठ्या प्रमाणावर कारणीभूत झाला यात शंका नाही. त्यामुळे राष्ट्रीय चळवळ हे राष्ट्रवादाचे राजकीय रूप व प्राचीन विद्यांचा अभ्यास व त्याचे मराठीतून प्रकटिकरण हे राष्ट्रवादाचे सांस्कृतिक रूप होऊन बसले. आज सांस्कृतिक राष्ट्रवादाची चर्चा चालू आहे. सांस्कृतिक राष्ट्रवादाचे मूळ याप्रमाणे पाश्चात्यांनी सुरू केलेल्या प्राच्य विद्यांच्या अभ्यासाशी नेऊन भिडविता येते.

(इ) आधुनिक महाराष्ट्रीय विद्वानांनी पारंपरिक विज्ञानांचा जो अभ्यास सुरू केला तीत आपल्याला दोन उद्देश दिसतात. पहिले, पाश्चात्यांनी केलेल्या प्राच्य विद्यांच्या अभ्यासाचा आधार घेऊन व काहीसा त्याचा प्रतिसाद म्हणून आपला अभ्यास मराठीतून मांडावयाचा. दुसरे, राष्ट्राभिमान व पूर्वजाभिमान यांना फुंकर घालून हे अभिमान जागते व जळते ठेवायचे.

केवळे विद्याप्रधान (ॲकॅडेमिक) अंगाने पाहिले तर वरील दोन उद्देशांमुळे या अभ्यासात काही अगांतुक व्यंग्ये निर्माण झालेली आपल्याला आढळतात. एक म्हणजे पाश्चात्यांनी या विज्ञानांचा अभ्यास करताना ज्या चुका केल्या असतील त्याबद्दल त्यांना फैलावर घेणे. जर टीकाकार इंग्रजीत लिहीत असेल तर त्याने अशी कठोर दूषणे देणे प्रस्तुत झाले असते. पण मराठीत लिहिताना अशा चुकीचा केवळ उल्लेख करणे पुरेसे होईल. दुसरे पौर्वापर्याविषयी शुष्क वाद. म्हणजे अमुक शोध भारतीयांनी पाश्चात्यांच्या आधी लावला असा दावा हिरिरीने सांगणे. उदा. शुल्बसूत्रात काटकोण त्रिकोणाच्या गुणधर्माचा (कर्णाचा वर्ग = बाजूंच्या वर्गांची बेरीज) उल्लेख आला आहे. त्यावरून पायथॅगोरसाचे प्रमेय भारतीयांनी शोधून काढले, असा आग्रह सांगणे. अशा वादातून काही निष्पन्न होण्याची शक्यता सहसा असत नाही. तिसरा भाग असा की, संस्कृत ग्रंथातील हकीकत ही वस्तुस्थिती होती की कल्पनारंजन होते, याचा तारतम्यपूर्वक विचार न करता भारतीयांना विमाने माहीत होती अशा सारखे भरमसाट मनोरे उभे करणे. या पैकी काहींची उदाहरणे या निबंधात पुढे देऊ.

भारतीय व महाराष्ट्रीय अभ्यासकांनी आपल्या परंपरेचा विचार करताना दोन गोष्टींची दखल घेतली नाही, ही दुर्दैवाची गोष्ट होय. पहिले असे की, आपण इतिहासाच्या अशा टप्प्यावर येऊन पारंपरिक विज्ञानांचा अभ्यास करीत होतो की जिथे त्याच क्षेत्रात पाश्चात्य विज्ञानांनी नेत्रदीपक प्रगती केलेली प्रत्ययाला येत होती. अशा वेळी प्राचीन विद्वानांनी कोणती प्रमेये शोधून काढली याचा अभ्यास करताना ज्या विचार प्रक्रियेतून हे शोध लागले, त्या प्रक्रियेच्या विश्लेषणावर भर द्यायला हवा होता. आपल्या प्राचीन शास्त्रज्ञाना कोणते प्रश्न सोडवावेसे वाटत होते, त्या प्रश्नाचे परिस्थितीजन्य पृथक्करण (सिच्युएशनल ॲनालिसिस) ते कसे करत असत, या बाबतीत ज्या तर्कशास्त्राचा आधार ते शास्त्रज्ञ घेत त्या तर्कशास्त्राचे स्वरूप काय होते या गोष्टींचा खल अधिक कालोचित झाल असता. थोडक्यात म्हणजे भारतीय विज्ञानांचे पद्धतिशास्त्र काय होते, हे पाहणे उद्‌बोधक व मनोरंजक झाले असते.

दुसरे असे की, पाश्चात्य अभ्यासक भारतीय विज्ञानांकडे संग्रहालयीन अवशेष (म्युझियम पीसेस) म्हणून पाहात होते. या विज्ञानांच्या अभ्यासाची परंपरा आता खुंटली आहे; ही परंपरा आता तरी प्रमेये प्रसवीत नाही अशा समजुतीत पाश्चात्य पंडित या विज्ञानांकडे पाहात होते. पण ज्योतिष व आयुर्वेद यांच्या परंपरा आजही अस्तित्वात आहेत व १९व्या शतकात त्या जास्तच जोमदार होत्या त्यामुळे त्या परंपरांचा अभ्यास त्या परंपरांच्या चौकटीत राहून व आवश्यक तेथे पाश्चात्य

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रमेयांची कलमे त्या परंपरेवर करवून पुढे नेता येणे शक्य होते. पण काही मोजके अपवाद वगळता तसे झाले नाही. या अपवादांचा परामर्श मी पुढे घेणार आहे.

(ई) हा विषय फार विस्तृत आहे आणि वाङ्मयही संख्येने मोठे आहे. या समन्वयाचा आढावा या तुलनेने लहान लेखात घेता येणार नाही व त्या सर्व विज्ञानांचा अभ्यास करावा इतकी माझी तयारीही नाही. सबब या लेखापुरता मी ज्या मर्यादा आखून घेतल्या आहेत, त्यांचा उल्लेख सुरुवातीलाच करतो.

पहिले असे की, या लेखात मी आयुर्वेद हा विषय अजिबात घेतलेला नाही. या विषयावरील वाङ्मय फार विस्तृत आहे. गर्द्यांनी केलेले वाग्भटाचे भाषांतर सुमारे १४०० पानांचे असून त्याची प्रस्तावना व परिशिष्टे मिळून दोनशे पाने भरतील. या नमुन्यावरून या वाङ्मयाच्या विस्ताराची कल्पना येईल. हे भाषांतर १८९०-९१ साली प्रकाशित झाले आहे. आयुर्वेद घ्यायचा नाही असे नाइलाजाने ठरवल्यानंतर त्याच्या अनुषंगाने येणारे रसायनशास्त्र सोडावे लागले. किमयेशी संबंधित रसायनशास्त्रच या लेखात घेतले आहे.

दुसरे, माझा अभ्यास मुख्यतः १८६० पासून १९३० पर्यंत निर्माण झालेल्या वाङ्मयावर आधारलेला आहे. असे करण्यात एक सोय व एक अडचण आहे. सोय अशी की, दाते-सूचीतून या विषयावरील ग्रंथांची यादी मिळू शकते. दातेसूची १९३७ सालापर्यंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांविषयी आहे. अडचण ही की, या यादीतील पुस्तके आता मिळणे अवघड झाले आहे. पुणे मराठी ग्रंथालयाचे कार्याध्यक्ष व माझे विद्यार्थीमित्र प्रा. चारुदत्त निमकर यांच्या सहाय्याने व तेथील ग्रंथपाल यांच्या सहकार्याने मी काही महत्त्वाची पुस्तके मिळवू शकलो.

तिसरी अवघड निवड करावयाची ती ही की, प्राचीन विज्ञान व तंत्रज्ञान हा विषय कोठवर न्यायचा व त्यावरील भाष्याला किती जागा द्यावयाची. उदा. ज्योतिषावर लिहिताना ज्योतिषाचा विषय जो आकाशातल्या गोलांची गती, त्याची माहिती दिल्या खेरीज निबंधाला पूर्तता येणार नाही. त्यामुळे या निबंधात निवडक विज्ञाने व त्यावरील निवडक ग्रंथ इतक्यांनाच जागा देता आली. उदा. ज्योतिषांवर लिहिताना कै. शं.बा. दीक्षित यांचा अद्वितीय ग्रंथराज *भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास* याचा उल्लेख न करणे अक्षम्य आहे. पण हा विषय मी ज्या दृष्टिकोणातून मांडू इच्छितो, त्या दृष्टिकोणामुळे या ग्रंथाचा परामर्श घेता येत नाही, ही नाखुशीची पण नाईलाजाची गोष्ट आहे.

या निबंधात माझा भर ज्योतिष व गणित या विज्ञानांवर असून त्या खालोखाल रसायन व शिल्पशास्त्र यांचा उल्लेख येईल.

**रसायनशास्त्र, यंत्रविद्या व शिल्पशास्त्र**

(अ) भारतीय रसायनशास्त्राचे दोन भाग पडतात. एक रसायन व दुसरा रसवैद्यक. रसायनशास्त्राचे देहसिद्धी व लोहसिद्धी असे दोन उद्देश आहे. निरोगी शरीर ठेवून अजरामर होणे हा देहसिद्धीचा अर्थ आहे; तर लोखंडासारख्या हीन धातूंचे सोन्यात रूपांतर करणे हे लोहसिद्धीचे प्राप्तव्य आहे. पहिला उद्देश ठेवून केलेला अभ्यास रसवैद्यकात मोडतो तर दुसऱ्या उद्देशाने केलेल्या अभ्यासाला किमया किंवा रसायन असे म्हणतात. रसवैद्यक हा खरे तर आयुर्वेदाचाच भाग होय म्हणून प्रस्तुत लेखात रसवैद्यक वगळून किमयेविषयींच्या वाङ्मयाचा विचार केला आहे.

लोहसिद्धी हा उद्देश बाळगून संशोधिलेल्या रसायन-शास्त्रावरील, म्हणजेच किमयेवरील, ग्रंथ आज अतिशय दुर्मिळ झाले आहेत. हे तंत्रमार्गातील ग्रंथ असून सांकेतिक भाषेत लिहिलेले असल्याने समजण्यासही दुरापास्त आहेत. मराठीत, आपल्यास अभिप्रेत असलेल्या कालखंडात, या विषयावर दहा तरी पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यातील दोन पुस्तके गुलामलाल महंमदशा या मुसलमान गृहस्थानी लिहिली आहेत. *जटली क्रिया* व *निघंटरहस्य* अशी त्यांची नावे असून ती अनुक्रमे १९१९ व १९२१ साली प्रसिद्ध झाली.

त्र्यंबक गुरूनाथ काळे हे टिळक व गांधी युगात मोठे खटपट्ये गृहस्थ होऊन गेले. राष्ट्रीय चळवळींशी त्यांचा जवळचा संबंध होता व त्यांनी केलेल्या नव्या प्रकारच्या चरख्याचे टिळकांनी कौतुक केले होते. देशाच्या स्वातंत्र्याचा ध्यास घेतलेल्या कित्येक तरुणांना तंत्रमार्गाचे आकर्षण वाटे. तंत्रग्रंथातून सांगितलेल्या गूढ प्रक्रियांच्या सहाय्याने आपण अतिभौतिक शस्त्रींवर काबू मिळवून राष्ट्र स्वतंत्र करू असे मनोरथ या तरूणांचे असत. बंगाल्यात तंत्रमार्गाचे प्राबल्य फार होते व एकोणिसाव्या-विसाव्या शतकांच्या सांध्यावर मराठी सुशिक्षित व बंगाली भद्रलोक यांचा दाट परिचय झाला होता. अशा परिस्थितीत काळ्यांनी रसायनाचा अभ्यास सुरू केला व १९१२ साली *भारतीय रसायनशास्त्र* हा ग्रंथ लिहून प्रसिद्ध केला.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ग्रंथाच्या आरंभी त्यांनी अशी माहिती दिली आहे की, जून १९०८ मध्ये एका बैराग्याने त्यांच्यासमक्ष तांब्यापासून सोने करून दाखवले. (पान १७ - पानांचे आकडे वर उल्लेखिलेल्या ग्रंथातील). त्यावरून काळ्यांनी असा निष्कर्ष काढला आहे की, सोने-रुपे ही मूलद्रव्ये नसून संयुगे (कंपाऊंड्स) आहेत. (पान १८) वारकऱ्यांमध्ये प्रचलित असलेल्या प्रकाराचा हवाला देवून काळे सांगतात की, नामपंथीय म्हणजेच तंत्रमार्गी ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीत किमयेवरील काही ओव्या घातल्या होत्या पण निवृत्तिनाथांनी त्या ओव्या गाळल्या. (पान १२)

रसायनात पाऱ्याला फार महत्त्व आहे. तंत्रशास्त्रात पाऱ्याला शिवतीर्थ म्हटले असून इतर धातू पाऱ्यापासून बनले आहेत, असे सांगितले आहे. (पान २०, तळटीप). रसवैद्यकाने पाऱ्याचा उपयोग देहसिद्धीसाठी तर रसायनाने लोहसिद्धिसाठी करून घेतला. शुद्ध पाऱ्याच्या भस्मापासून शरीरातील रोग हटतात तर पाऱ्यावर दिव्यौषधींची क्रिया करून पाऱ्याचेच सोने व रुपे यात परिवर्तन करता येते. काळ्यांनी सांगितले आहे की, 'ज्यांना ही विद्या मिळाली त्यांनी ती परिभाषेच्या दडपणाखाली लपवून ठेवली आहे. त्या परिभाषेचे पटल भेदून ज्यांना या ग्रंथात गति मिळविता येते, त्यांनाच ही विद्या साध्य होते." (पान ११८)

किमयेवरील काळ्यांचा हा विश्वास अनाठायी आहे. त्याचप्रमाणे काळ्यांचा स्वराष्ट्रभिमानही बरेचदा अनाठायी स्वरूप घेतो. त्यांनी म्हटले आहे. "भारतवर्षातूनच ही (रस) विद्या पाश्चात्य देशात २०००-३००० वर्षांपूर्वी पसरली; हे कळून येते." (पान ३१). तसेच, "पाश्चात्यातील प्राचीन रसविद्या व आपल्याकडील रसविद्या यात बरेच साम्य असून, बहुधा आपल्या देशातूनच ही रसविद्या तिकडे गेली असावी, असे मानण्यास उत्तम कारणे दिसू लागली." (पान १४६)

तथापि या दोन गोष्टी बाजूला ठेवून आपणास हे मान्य करावे लागेल की, हे पुस्तक लिहिण्यासाठी काळ्यांनी खूप परिश्रम घेतले असले पाहिजेत. या पोथ्या हाती लागणे कठीण. पण काळयांनी साठाहून जास्त ग्रंथकारांचे ग्रंथ डोळ्याखालून घातले. त्यांच्या काळाची तारतम्याने चर्चा केली. ते सांगतात की, *रसरत्नसमुच्चया* पेक्षा *रसरत्नाकर* प्राचीनतर आहे व *रसरत्नसमुच्चया* हा ग्रंथ १३व्या शतकात लिहिला गेला. (पान ४४)

(आ) *प्राचीन यंत्रकलासाहित्य* नावाचे पुस्तक माधव सुरतकर यांनी इ.स. १९०८ मध्ये प्रसिद्ध केले. हे फक्त ३८ पानी पुस्तक आहे. सुरतकर हे मेकॅनिकल इंजिनियर होते. त्यांनी स्वतःला कलाशिक्षणकार असे म्हणवून घेतले आहे. हे लेख आधी *केसरी* व *काळ* या त्या वेळच्या राष्ट्रवादी वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाले आहे. वर उल्लेखिलेले काळ्यांचे पुस्तक १९१२ सालचे आहे व त्यातील लेखही आधी *केसरी*तून प्रसिद्ध झाले होते. यावरून असे दिसून येते की, १९०५ सालच्या वंगभंगाच्या चळवळीत जी राष्ट्रीय शिक्षणाची लाट उसळली तिच्या प्रभावाखाली आणि राष्ट्रीय शाळातून क्रमिक पुस्तके म्हणून शिकवली जावीत या उद्देशाने ही पुस्तके लिहिली गेली. सुरतकरांनी प्रस्तावनेत लिहिलेच आहे की, 'प्राचीन शिल्प व यंत्रविद्येचा अभ्यास राष्ट्रीय शिक्षणाचे कामी आवश्यक आहे.'

काळ्यांप्रमाणेचं सुरतकरांचा आग्रह असा आहे की, 'परंपरापूर्ण श्लोकांचा अर्थ यांत्रिक पद्धतीने कसा लावावा व तो व्यवहारात प्रयोगरूपाने कसा घ्यावा हेच मोठे दुर्घट आहे'. (पान २२) सूर्यसिद्धान्तातील 'एकाकी योजयेत बीजै यंत्रे विस्मयकारिणी' हा श्लोकार्ध देऊन ते सांगतात की, 'दुसरा कोणी परस्थ ही कला सहज शिकत जाईल, म्हणून ती गुप्त रूपाने करावी! (पान २३)

सुरतकरांनी प्राचीन ग्रंथातील मयूरयंत्र व विषुवयंत्र यांची माहिती देऊन व संबंधित श्लोक उद्धृत करून असा कयास मांडला आहे की, ही यंत्रे म्हणजे स्प्रिंगची व लंबकाची घड्याळे असावीत. दंडकालाच (म्हणजे ठराविक काळाचा) व्यय झाल्यावर मयूर यंत्रातील 'मोर पंख उभारून टाहो फोडीत असे! आता असा प्रश्न उद्भवतो की, जुन्या काळातील कारागिरांनी अशी यंत्रे बाजारपेठेत का आणली नाहीत? किंवा सुरतकारांनी अशी घड्याळे का तयार केली नाहीत अगर काबूत घेतली नाहीत? यातून महत्त्वाचे म्हणजे ही उपयुक्त कला नाहीशी कशी झाली?

वारिमसिंह उर्फ ओग्यदेव नावाच्या माणसाच्या *गद्य-चिंतामणी* नावाच्या पोथीचा हवाला देवून सुरतकर असे लिहितात की, मयूरात्मक विमान त्या काळी होते. सत्यसंघ नावाच्या राजाच्या पत्नीला ती वेढ्यात अडकली असता अशाच 'बलून'च्या सहाय्याने सोडवून बाहेर नेले. येथे हे सांगितले पाहिजे की, इतिहासाचार्य राजवाड्यांनी *हर्षचरित्रा*तील एका प्रसंगावरुन प्राचीन काळी विमाने होती, असा दावा केला होता. वृजेंद्रनाथ

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शील यांच्या *द पॉझिटिव्ह सायन्सेस ऑफ हिंदूज* या ग्रंथात सांगितले आहे की, पूर्वी 'बलून्स' असल्याचे उल्लेख अनेक ठिकाणी आढळतात. असे शक्य आहे की, १८७० साली पॅरिसला वेढा पडल्यानंतर पॅरिसमधील लोकांनी बलूनच्या सहाय्याने बाहेरच्या जगाशी संबंध ठेवला होता, या गोष्टीचा प्रभाव या विद्वानांच्या कल्पनांवर पडला असावा.

(इ) *प्राचीन हिंदी शिल्पशास्त्रसार* हा ग्रंथ कृष्णाजी नारायण वझे यांनी लिहिला व भारत इतिहास संशोधक मंडळाने तो १९२९ साली प्रसिद्ध केला. वरदा बुक्सने त्याची आवृत्ती १९९४ साली काढली. या आवृत्तीला श्री. प्र.रा. अहिरराव यांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना आहे. वझे हे १८९१ साली पुण्याच्या अभियांत्रिकी महाविद्यालयामधून एल्.सी.ई. ही पदवी मिळविलेले स्थापत्यशास्त्री होते. त्यांनी सार्वजनिक बांधकाम खात्यात नोकरी केली.

*प्राचीन हिंदी शिल्पशास्त्रसार* या ग्रंथाचे धातुखंड, साधनाखंड व वास्तुखंड असे तीन खंड असून चौथा प्रस्तावनाखंड हा स्वतंत्र खंड मानला आहे. या प्रस्तवनाखंडात वझे सांगतात की, 'हा मी व ते जग' असे जगाचे दोन भाग दिसतात. मी व जग यांची जोडणी शरीराच्या सहाय्याने होते. या शरीराला अन्न व वस्त्र या दोन प्रकारचे भोग लागतात. शिल्पाचा जन्म माणसाला हे भोग मिळवून देण्यासाठी होतो. जगातील वस्तुंना त्या माणसाच्या उपयोगी पडतील असे रुप देणे म्हणजे शिल्प.

शिल्पशास्त्राचे अठरा आचार्य होते व त्यांच्या अठरा संहिता होत्या. आता *कश्मयसंहिता*, *भृगुसंहिता* व *मयसंहिता* अशा तीनच संहिता पूर्ण स्वरूपात उपलब्ध आहेत. प्रत्येक संहितेत दहा शास्त्रांचा विचार केलेला आहे व या शास्त्रांची वाटणी तीन खंडांत केलेली आहे. धातुखंडात सुखसोई तयार करण्यासाठी लागणारे सामान मिळवण्याची माहिती दिलेली आहे; साधनाखंडात हे सामान इष्टस्थानी वाहून आणण्याबद्दलची माहिती आहे; तर वास्तुखंडात मिळविलेले सामान वापरून सुखसोई कशा निर्माण कराव्यात ते सांगितले आहे.

या ग्रंथातही विमानशास्त्राचा उल्लेख आहे. येथे सांगितलेले विमान म्हणजे हवेपेक्षा हलका वायु भरलेली लखोटाबंद व स्थितिस्थापत्य पिशवी किंवा फुगा अशा स्वरूपाचे आहे. वझ्यांचा असा दावा आहे की, अगस्त्य-संहितेचा जो भाग उपलब्ध आहे त्यात बॅटरी सेलचा उर्फ कुंभाचा उल्लेख आहे. या शंभर बॅटरी सेल्सला पारा फासलेल्या जस्ताच्या तुकड्यांनी जोडले म्हणजे त्या तुकड्याच्या साखळीतून विजेचा प्रवाह जातो. या प्रवाहाने पाण्याचे पृथक्करण होऊन प्राणवायु म्हणजे ऑक्सिजन व उदानवायु म्हणजे हैड्रोजन असे निराळे होतात. त्यापैकी उदानवायु हा हवेपेक्षा हलका असतो. तो लखोटबंद पिशवीत आला तर पिशवी हवेत तरंगू लागते. या पिशवीला दोरखंड बांधून हलक्या लाकडाची फळी टांगत व शिकवून तयार केलेले पक्षी पिशवीला जुंपून पिशवी इकडून तिकडे नेता येई. (पाने १४८-१५०)

इथे प्रश्न असा येतो की, युद्धाच्या दृष्टीने बलून हे फार उपयोगी साधन आहे. हिंदुस्थानात आपापसांत व परस्परांशी सतत लढाया होत होत्या. असे असेल तर सत्ताधीशांनी ही कला लुप्त कशी होऊ दिली? की, बलून किंवा विमान ही कविकल्पनाच होती व शास्त्रग्रंथात त्या कल्पनेला विश्वासार्हता यावी यासाठी अधिक तपशिलाची जोड दिली होती? त्याहून पुढे जाऊन असाही कयास बांधता येतो की, काव्य, चरित्र, वैज्ञानिक ग्रंथ, तंत्रसाधना अशा तऱ्हेचे भेद तेव्हा काटेकोरपणे पाळत नव्हते. त्यामुळे शिल्पशास्त्रातील संहितातही कल्पना-रंजनाला वाव होता.

**गणित आणि ज्योतिष**

(अ) भारतीय परंपरेत गणिताला स्वतंत्र स्थान नव्हते. गणित हे ज्योतिषाची एक शाखा किंवा संघ म्हणून ओळखले जाई. ज्योतिषात निर्माण झालेले प्रश्न सोडविण्याचे साधन हा गणिताचा मुख्य उपयोग होता. याचा अर्थ व्यावहारिक प्रश्न जसे की, भांडवलावरील व्याज काढणे, क्षेत्रफळ-घनफळ इ., यासाठी गणिताचा वापर करत नव्हते, असा नाही. छंदशास्त्रातील गणवृत्तांची व्यवस्था लावण्यासाठी 'अंकपाश' म्हणजे परम्युटेशन्स याचा उपयोग करत होते. हे प्रसिद्धच आहे. (एकनाथ गोविंद गोसावी यांनी *वृत्तगणितादर्श* नावाचे पुस्तक १९११ साली *लीलावती*तील पद्धतींचा उपयोग करून लिहिले आहे.) परंतु, ग्रीक संस्कृतीत ज्याप्रमाणे गणिताला व मुख्यतः भूमितीला एक स्वतंत्र विज्ञान म्हणून स्थान मिळाले, तसे आपल्याकडे झाले नाही. प्रमेयांची बांधणी निगमनाच्या साखळीत करून त्या साखळीला मूलतत्त्वांचा आधार देण्याची शैली ग्रीकांनी विकसित केली. अभ्यासाचा नक्की नियम कोणता, गणिती विधाने ज्या वस्तूंविषयी बोलतात त्या वस्तूंचे स्वरूप काय, यांची शहानिशा ग्रीक गणितात वारंवार होत असे. अमूर्ततेच्या (ॲबस्ट्रॅक्शन्स) ला पातळीवर भारतीय गणित कधी पोचले नाही.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भारतीय गणितातील अतिशय लोकप्रिय पुस्तक म्हणजे *लीलावती*. भास्कराचार्यांच्या *सिद्धान्तशिरोमणि*चा तो पहिला भाग आहे. संपूर्ण *लीलावती*चे किंवा त्यातील काही भागाचे अशी अनेक भाषांतरे प्रसिद्ध केले.

तथापि, विनायक पांडुरंगशास्त्री खानापूर (१८५८-१९१९) यांनी लीलावती, बीजगणित व गणिताध्याय या *सिद्धान्त-शिरोमणी*च्या पहिल्या तीन भागांची सोपपत्तिक भाषांतरे १८९३ व १९१३ साली प्रसिद्ध केली. या पुस्तकांच्या नव्या आवृत्त्या वरदा बुक्सने प्रसिद्ध करून अभ्यासकांना ऋणी करून ठेवले आहे. खानापूरकरांची भाषांतरे सोपपत्तिक आहेत. जुन्या ग्रंथातून प्रश्न सोडविण्याच्या फक्त रीती देत असत. त्या रीतींचे खुलासे शिक्षक विद्यार्थ्याला तोंडी सांगत. या खुलाशांना उपपत्ती म्हणत. मौखिक दळणवळणातून आलेल्या या पारंपरिक उपपत्ती आता लुप्त झाल्या आहेत. खानापूरकर हे पंचांगकर्त्यांच्या कुटुंबात जन्मले व वडिलांपाशी त्यांनी अध्ययन केले. त्यामुळे त्यांनी दिलेल्या उपपत्ती बहुधा पारंपरिक आहेत. प्राचीन मार्गांनी विचार कसा चालत असे याची कल्पना या उपपत्तीवरून येते.

प्रमेयांच्या सिद्धता या दृष्टीने या उपपत्तींचा आधुनिक गणिताच्या संख्यांत जो विचार व्हायला हवा होता, तो झाला नाही. प्रा. ना.ह. फडके यांनी *भारतीय गणिती* आणि *लीलावती* (भाषांतर) अशी पुस्तके लिहिली. त्यांनी या पुस्तकात पारंपरिक उपपत्तींपैकी दोन-तीन उपपत्तींची चर्चा केली आहे. नेमक्या कोणत्या वाचकवर्गासाठी आपण पुस्तक लिहीत आहोत. याचा निर्णय न झाल्याने भाषांतरकर्त्यांची पंचाईत झाली असावी, असे दिसते.

(आ) पारंपरिक विज्ञानाकडे पाहाण्याचे प्राच्य-विद्या-अभ्यासकांचे परिप्रेक्ष्य, ती विज्ञाने संग्रहालयीन अवशेष, आहेत असे समजून त्यांची परीक्षा करण्याचे असते. पण गेल्या शतकाच्या पहिल्या चरणात जी पंचांगशोधनाची चळवळ झाली तिने भारतीय ज्योतिष जिवन्त आहे व ते नवीन सुधारणांचा स्वीकार करू शकते, असा दृष्टिकोण आग्रहाने मांडला. यासाठी त्या चळवळीची दखल घेणे अगत्याचे आहे.

ज्योतिषाचा हा विशेष आहे की, ग्रहगोलांच्या गतीबाबत प्रथम दर्शनी स्पृहणीय नियमबद्धता आढळते. पण अधिक सूक्ष्मदर्शी वेध घेतल्यानंतर त्या ढोबळ नियमात दुरुस्त्या करण्याची गरज भासते. उदा. समृद्धदर्शनी चंद्राची पृथ्वीभोवती कक्षा व सूर्याची पृथ्वीभोवतीची कक्षा व सूर्याची पृथ्वी भोवतीची क्रांतिवृत्त नावाची कक्षा या दोन्ही एकच आहेत असे वाटते. पण काटेकोर वेध घेतल्यावर कळते की, या दोन कक्षांच्या प्रतलात ५° चा कोन आहे. किंवा प्रथमदर्शनी पृथ्वीचा आस ध्रुव ताऱ्याकडे रोखलेला वाटतो; पण सूक्ष्म वेधावरून ध्रुव ताऱ्यापासून तो आस १° कललेला आहे; असे कळून येते. यासाठी मूळ नियमात नवीन निरीक्षणांच्या आधाराने बदल करावे लागतात. पूर्वीच्या काळी जुन्या सिद्धान्तग्रंथांत जे स्थिरांक (कॅन्स्टंट्स) असत व ज्यांना बीजे म्हणत ते नवीन ग्रंथात सुधारून घेत व या सुधारणेला बीजसंस्कार असे म्हणत. *सूर्यसिद्धान्त* या मूळग्रंथाची दुसरी आवृत्ती ४०० वर्षानंतर इ.स. ८०० च्या सुमारास किंवा त्यानंतर कोणी तरी तयार केली. तीन बीजसंस्कार केल्याचे आढळून येते.

या सिद्धान्तग्रंथावरून करणग्रंथ किंवा नियमपुस्तिका (मॅन्युअल) तयार करीत. हे करणग्रंथ गावोगावच्या जोश्यांकडे असत. या ग्रंथावरून जोशी रोजचे पंचांग सांगत. लोकांचे सामाजिक व कौटुंबिक व्यवहार त्यावरून ठरत. *सूर्यसिद्धान्ता*च्या दुसऱ्या आवृत्तीवर आधारलेला *ग्रहलाघव* हा करणग्रंथ गणेश दैवज्ञाने १६व्या शतकात रचला. महाराष्ट्रातील जोशी या 'ग्रहलाघवा'च्या सहाय्याने पंचांग सांगत.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात पाश्चात्य जोतिषाशी महाराष्ट्रातील सुशिक्षितांचा परिचय झाला. तेव्हा त्यांच्या मनात आले की, *सूर्यसिद्धान्ता*तील म्हणजेच *ग्रहलाघवा*तील बीजांवर संस्कार करून पाश्चात्यांनी निश्चित केलेली बीजे स्वीकारावीत. उदा. पाश्चात्य जोतिषानुसार नक्षत्र वर्षमान ३६५ दिवस, १५ घटी, २२ पळे व २८ विपळे असे आहे. तर सूर्य विद्वान्तात हेच मान ३६५ दिवस, १५ घटी, ३१ पळे व २८ विपळे असे आहे. तेव्हा बीजसंस्काराने नवीन मान स्वीकारावे.

येथे हे लक्षात घेणे जरूर आहे की, हे पंचागप्रवर्तक पाश्चात्य ज्योतिषातील सिद्धान्त, उदा., सूर्यकेंद्री ग्रहमाला, स्वीकारावी असे म्हणत नव्हते. ते जी सुधारणा पुरस्कारित होते, ती फक्त निरीक्षणांच्या स्तरावरची होती. या मर्यादेमुळे नवी करणग्रंथ लिहून अपेक्षित सुधारणा करता येत होती व ती परंपरापूनित झाली असती, असे या प्रवर्तकांना वाटत होते. 'पंचांगप्रवर्तनकमेटी'ने (समिती हा शब्द तेव्हा आला नसावा.) १९०४ साली व १९२० साली असे करणग्रंथ मागवले. त्याला प्रतिसाद म्हणून जे दोन करणग्रंथ आले त्यांची ओळख करून घेऊ.






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(इ) *करणकौमुदी* हा ग्रंथ शिवराम गणपत पवार यांनी लिहून १९०७ साली प्रसिद्ध केला. मराठा समाजातील मुळात शेतकरी असणारे हे गृहस्थ पुढे जेऊर येथील प्राथमिक शाळेत शिक्षक होते. तथापि त्यांनी आधुनिक गणिताचा दांडगा अभ्यास केला होता असे प्रस्तावनेवरून दिसून येते. ते लिहितात, 'मी मराठ्यांच्या कुळात उत्पन्न झालो आहे आणि मराठ्यांत विद्येची विशेष आवश्यकता वाटत नाही.... ज्यांनी मला उत्तेजन दिले ते माझे प्रिय गुरुजी कै. भास्कर महादेव केळकर हे होत. ह्यांनी माझा शाळेतील अभ्यास पुरा करवून बीजगणित, घातांक (लाग्रथम) यांचे दिग्दर्शन करून दिले... माझे द्वितीय गुरुजी कै. रावजीशास्त्री देवकुळे यांनी मला... त्रिकोणमितीचे सांपपत्तिक शिक्षण दिले, तसेच घातांक, बौज्यभूमिती, गोलीय त्रिकोणमिती वगैरे विषयांचे दिग्दर्शन करून दिले. आणि शंकुच्छिन्नभूमिती, गत्युत्पादक प्रेरणा शास्त्र, सूक्ष्मांशगणित ह्या विषयांचे अध्ययन करून नंतर ज्योतिःशास्त्राचा अभ्यास करणे अशी मला आज्ञा केली होती.' (प्रस्तावना)

नवीन करणग्रंथाच्या आवश्यकतेबाबत ते लिहितात, *ग्रहलाघवास* सांप्रतकाली (१९०७) ३८० वर्षे साली आहेत. त्यामुळे त्याप्रमाणे गणित करून आलेले ग्रह वगैरे वेधास मिळत नाहीत. यास्तव नवीनकरणग्रंथाची अपेक्षा उत्पन्न झाली आहे. (पान १). नंतर आपल्या करणग्रंथाचा विशेष ते सांगतात की, 'या ग्रंथातील ग्रहादिकांचे प्रदक्षिणाकाल आधुनिक ज्योतिःशास्त्रविषयक ग्रंथातून घेतले आहेत. बुध, शुक्र, पृथ्वी, मंगळ, गुरू व शनी हे ग्रह सूर्याभोवती फिरतात असे मानले आहे. (पान २)

पण त्या वेळी पंचांगप्रवर्तन कमेटीने कोणत्याच करणग्रंथाला बक्षिस दिले नाही. त्याची काय कारणे असतील ती असोत. मला वाटते की, पवारांनी केलेली आमूलाग्र सुधारणा कमेटीला पचणारी नव्हती.

(ई) त्यानंतर प्रसिद्ध विद्वान केशव लक्ष्मण दप्तरी यांनी लिहिलेला *करणकल्पकता* हा 'शुद्धपंचांगोपयोगी नवा करणग्रंथ' पंचांग प्रवर्तन कमेटीने १९२४ साली प्रसिद्ध केला. आज ज्याला नवे किंवा *टिळक पंचांग* म्हणतात ते या कलाग्रंथावर आधारलेले आहे. या *करणकल्पकता* कमेटीचे अध्यक्ष प्रा. नि.बं. नाईक यांनी विवेचक प्रस्तावना लिहिली असून नवीन करणग्रंथात कोणते बीजसंस्कार केले आहेत, ते सांगितले आहे.

हे बीजसंस्कार तीन प्रकारचे आहेत. पहिला हा की, पाश्चात्य नक्षत्र वर्षमान घेणे. दुसरे अयनगतीचे ५०-२ विकला हे मान स्वीकारायचे व *ग्रहलाघवा*तील ६० विकला हे मान सोडून द्यायचे. तिसरे रेवती नक्षत्र हा नक्षत्रमंडळाचा आरंभबिंदू मानावयाचा. यावरून दिसून येईल की, इथे कोणताही सैद्धांन्तिक वदल सुचवलेला नसून फक्त बीजसंस्कार सांगितला आहे.

*करणकल्पकता* हा ग्रंथ संस्कृतमध्ये आहे. खरे तर या निबंधात त्याचा समावेश करणे प्रथमदर्शनी योग्य वाटणार नाही. पण येथे प्रत्येक संस्कृतभाषेत लिहिलेल्या नियमाचे लगेच मराठी भाषांतर दिले असून उदाहरणे व स्पष्टीकरणे केवळ मराठीतच आहेत. त्यामुळे *करणकल्पकता* या ग्रंथाला मराठी ग्रंथात म्हणणे योग्य होईल. खुद्द दप्तरींनी आपल्या प्रस्तावनेत म्हटले आहे की, 'सांप्रत करणग्रंथ करताना पाश्चिमात्य ज्योतिषाकडे दुर्लक्ष करणे शक्य नाही;... त्याचप्रमाणे भारतीय ज्योतिषांनी ठरविलेल्या ग्रहगतींच्या मानांचा अविचाराने त्याग करून पाश्चात्य शास्त्रातील मानांचा स्वीकार करण्याकडेही भारतीयांचे मन एका एकी वळणार नाही... मनात अशी कल्पना आली की, पाश्चिमात्य जोतिषातील व भारतीय ज्योतिषातील मानांचा मेळ बसविता आलाच पाहिजे... आपणास सध्या जितकी सूक्ष्मता पाहिजे त्या दृष्टीने माझ्या मते ठरणारी ही भारतीय माने किंवा पाश्चिमात्य माने यातील कोणतीही स्वीकारता येतील. करणग्रंथ सर्वमान्य व्हावा म्हणून आम्ही पाश्चिमात्य ज्योतिषातील माने स्वीकारली

(ड) यावरून हे दिसून येईल की, पंचांग-प्रवर्तन-कमेटीने भारतीय ज्योतिषाच्या व्यासपीठावर बसून पाश्चात्य ज्योतिषातील बीजांचा स्वीकार करण्याचा उपक्रम केला. ऐतिहासिक काळात भारतीय ज्योतिषाचे परकीय ज्योतिषातील माने स्वीकारली होती हे *रोमक* व *पुलिश* या परकी सिद्धान्तांना वराहमिहिराने आपल्या *पंचसिद्धान्तिके*त स्थान दिले त्यावरून दिसून येते. खुद्द *सूर्यसिद्धान्त* हा ग्रंथ देखील मय नावाच्या आसुराने लिहिला आहे.

परंतु शुद्ध पंचांगाचा स्वीकार मराठी समाजाने केला नाही. टिळक पंचांगाप्रमाणे सणवार पाळणारी कुटुंबे अगदी तुरळकच आहेत. स्वातंत्र्यानंतर १९५५ साली सरकारने डॉ. मेघनाद साहा यांच्या अध्यक्षतेखाली एक पंचांगशोधनसमिती नेमली होती. तिने सायन सौर पंचांग तयार केले. शासकीय


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कामासाठी आज त्या पंचांगाचा उपयोग करतात. परंतु उत्सव-समारंभासाठी भारतीय समाज ते पंचांग पाळत नाही.

**समारोप**

(अ) स्वातंत्र्यपूर्वकाळात 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' हे फार मोठे काम श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या संपादकत्वाखाली पार पडले. या ज्ञानकोशाचा पाचवा भाग 'विज्ञानेतिहास' नावाचा आहे. प्राचीन भारतीय विज्ञानाचा साक्षेपी व यथासांग इतिहास येथे दिला आहे. हे काम संकलनपर असल्याने मी त्याचा आढावा येथे घेतला नाही. तसेच निबंधाची लांबी वाढली असती म्हणूनही या उत्कृष्ट ग्रंथाचा केवळ उल्लेख करूनच इथे काम भागवावे लागत आहे. पण ज्याला म्हणून प्राचीन भारतीय विज्ञानाची परिपूर्ण माहिती एकत्र हवी असेल, त्याला ती या ग्रंथात मिळेल.

(आ) प्राचीन विज्ञानांच्या अभ्यासाकडे आधुनिक मराठी समाज वळला तो राष्ट्रवादाच्या भूमिकेतून. राष्ट्राचे चारित्र्य निर्माण करावयाचे असेल तर इतिहासाचा अभ्यास केला पाहिजे व इतिहासात आपल्यापूर्वजांचे उज्ज्वल कर्तृत्व दिसून आले पाहिजे. विज्ञान हा या कर्तृत्वाचा आणखी एक आविष्कार आहे. सध्या आपण जागतिकीकरणाच्या झपाट्यात आहोत. पाश्चात्यांचे वर्चस्व असणाऱ्या नव्या मानवी संस्कृतीत आपली संस्कृती विलीन होणार अशी चित्रे दिसत आहेत. या येऊ घातलेल्या संस्कृतीत भारतीय संस्कृतीच्या काही खुणा दिसणार असतील तर त्यातील एक महत्त्वाची खूण प्राचीन विज्ञाने ही असू शकेल. या संधिकाळात त्या हेतून भारतीय विज्ञानांचा अभ्यास झाला पाहिजे.

संयोजकांचे पुनः एकदा आभार मानून हा निबंध संपवितो.



---

**लेखक परिचय**

❖ **श्री.मा. भावे** : प्राध्यापक, आय.आय.टी. पवई, मुंबई; गणित व तत्त्वज्ञान या विषयाचे ज्येष्ठ अभ्यासक. या विषयांशी संबंधीत २५ शोधनिबंध प्रसिद्ध. शिक्षक चळवळीत सहभाग. **पत्ता** : ३३/२०, ४थी गल्ली, प्रभात रोड, पुणे ४११ ००४.

❖ **मीनाक्षी दीक्षित** : **पत्ता** : Y-11-167, शासकीय वसाहत, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.

❖ **प्रमोद बियाणी** : यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्तविद्यापीठ, नाशिक, येथे वाणिज्य-व्यवस्थापन विद्याशाखेचे प्रपाठक, अर्थ उपयोजकता व व्यवस्थापन या विषयात सातत्यपूर्ण लेखन. त्या विषयाची अनेक पुस्तके व लेख विविध नियतकालिकातून प्रसिद्ध. **पत्ता** : २, लक्ष्मी विलास, खतीव डेअरी मागे, गंगापूर रोड, नाशिक ४२२ ०१३.

❖ **विद्याकर वासुदेव भिडे** : निवृत्त माध्यमिक शिक्षक व पर्यवेक्षक, नू.म.वि. प्रशाला, पुणे. संस्कृत आणि समाजशास्त्राचे अभ्यासक. समाजशास्त्र, मानसशास्त्र या विषयावर विद्यापीठ परीक्षेस उपयुक्त पुस्तकांचे लेखन, *पुण्यसंस्कृती (२००३)* हे त्यांचे अलिकडेच प्रसिद्ध झालेले पुस्तक. **पत्ता** : 'चिंतामणी'. ११११ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

❖ **नागनाथ कोतापल्ले** : पुणे विद्यापीठात मराठी विभाग प्रमुख, *मध्यरात्र, गांधारीचे डोळे* या कादंबऱ्या, *सावित्रीचा निर्णय, कर्फ्यू आणि इतर कथा, राजधानी* इ. कथा संग्रह आणि *ग्रामीण साहित्य स्वरूप व शोध, मराठी कविता : एक दृष्टीक्षेप, ज्योतिपर्व* इ. समिक्षाग्रंथ प्रकाशित. **पत्ता** : रो-हाऊस नं. ४, प्लॅनेट मिलेनियम, पिंपळी-सौदागर, पुणे ४११ ०२७.





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# टागोर आणि गांधी यांचे शिक्षणविषयक आदर्श : एक तौलनिक अभ्यास*

परमेश आचार्य
(अनुवाद – मीनाक्षी दीक्षित)

जनमानसात सध्या मान्य असलेले विचार व कल्पना लक्षात घेता, गांधी व टागोर यांच्या शिक्षणविषयक आदर्शांचा वस्तुनिष्ठ अभ्यास मला तरी जरा अवघडच दिसतो. त्यांच्या लिखाणाच्या आकर्षक शैलीमुळे असेल कदाचित, पण टागोरांचे विचार समजाऊन घेणे, गांधी समजून घेण्यापेक्षा जरा कठिण दिसते. टागोरांची लेखनशैली विश्लेषणात्मक असण्यापेक्षा रूपकात्मक अधिक आहे. त्यामुळे ती मेंदूपेक्षा आपल्या हृदयाला अधिक भिडते. कितीही म्हटले तरी टागोर मूलतः एक कवी आहेत, त्यामुळे त्यांचे शैक्षणिक विचारही कविहृदयातून स्फुरलेले आणि साहजिकच सर्वांतील चांगले चांगले उचलून सर्वसमावेशक बनलेले असतात. त्यामुळे साहजिकच त्यांच्या विचारांचे अनेक रीतींनी स्पष्टीकरण देता येते. याच्या उलट, गांधी हे राजकारणातील नैतिकतेचे पुरस्कर्ते होते, जनतेच्या गरजा आणि आकांक्षा यांच्याशी त्यांच्या मनाचा संपूर्ण मेळ जमलेला होता, जनतेच्या भाषेत त्यांना विचार करता येत असे आणि त्यांच्या शिक्षणविषयक विचारात काही अस्पष्टपणा नसे. त्यांच्या मते, नैतिकतेवर आधारलेल्या राजकीय कार्यक्रमाचा शिक्षण हा एक अंगभूत भाग होता. आणि सर्वांनाच पटेल की, गांधींच्या पूर्वी भारतातील कोणत्याच राजकीय नेत्याने अथवा शिक्षणतज्ज्ञाने अशा रीतीने राजकारण व शिक्षण यांचा मेळ घातलेला नव्हता. बहुधा, टागोर आणि गांधी यांच्यातील मूलभूत फरक हाच आहे. तरीही त्यांच्या शिक्षणविषयक विचारांतील सारखेपणा, विशेषतः तात्त्विक पातळीवरील सारखेपणा दाखवणे फारसे अवघड नाही. परंतु त्या दोन्हीतील उघड दिसणारे फरक लक्षात न घेणे म्हणजे मूलोद्योग शिक्षण पद्धतीचा पायाच दुर्लक्षित करण्यासारखे आहे. वस्तुतः त्या दोघांनीही आपल्या विचारातील हे फरक पुष्कळदा प्रकट केले आहेत.

आयुष्याकडे पाहण्याच्या दृष्टिकोणात मूलभूतच फरक असल्यामुळे, गांधी व टागोर यांच्या शिक्षणविषयक लेखनातही ते फरक प्रतिबिंबित होतातच. टागोरांचा मानसिक कल कलासक्त असल्यामुळे, अर्थपूर्ण आयुष्याची त्यांची मध्यवर्ती कल्पना प्रत्येकाला निवांत वेळ मिळावा अशी होती. तर मानवी श्रमांना प्रतिष्ठा देण्याची गांधींची दृष्टी, मानवी शक्ती, उत्साह यांना विधायक कामाकडे वळविण्याची होती.

सुरुवातीसच मी हे स्पष्ट करू इच्छितो की, गांधीजी व टागोर या दोन थोर शिक्षणतज्ज्ञांच्या शिक्षणविषयक विचारांची वैशिष्ट्ये समजावून घेण्याचा हा एक नम्र प्रयत्न आहे. बदलत्या भारतीय अर्थव्यवस्थेच्या चालू संदर्भात या दोन्ही विचारांचा तुलनात्मक अभ्यास मनोवेधक ठरेल. आपल्या थोर शिक्षणतज्ज्ञांच्या आदर्शांपासून आपली प्रत्यक्षात असलेली शिक्षणपद्धती किती भिन्न आहे हेही आपणास कळेल. वास्तव परिस्थिती आणि आदर्श यातील फरकाने आपण निराश होऊ. कां की, शैक्षणिक आदर्शांचा मागोवा घेताना हे स्पष्ट होते की, देशातील शिक्षणपद्धती ही अंतिमतः थोर शिक्षणतज्ज्ञांच्या विचारांनुसार ठरत नसून, वास्तवात काय सोयीचे आहे यावर, म्हणजेच बाजारपेठेच्या गरजांनुसार ठरते. असे म्हणण्यात थोर शिक्षणतज्ज्ञांच्या मतांना, देशातील शिक्षणपद्धती ठरताना काही किंमतच नसते असे म्हणावयाचे नाही आहे. वस्तुतः कोणत्याही शिक्षणपद्धतीवर अनेक शिक्षणतज्ज्ञांच्या मतांचे ठसे उमटलेले दिसतील. कोणताही विचार अजिबात नाहीसा झाला असे कधी होत नसते. परंतु त्याच वेळी हेही खरे आहे की, रूसो, ड्यूई, टागोर, गांधी अशा थोर शिक्षणतज्ज्ञांनी शैक्षणिक विकासाचे जे आराखडे कल्पिले व ज्यांचे प्रयोग करून पाहिले, त्या आराखड्यांचा कोणत्याच देशातील शिक्षणपद्धतीच्या मुख्य प्रवाहात पाठपुरावा झालेला दिसत नाही.

---

* २२ मार्च १९९७ च्या *'इकॉनॉमिक अँड पॉलिटिकल विकली'*च्या अंकात प्रसिद्ध झालेल्या, परमेश आचार्य यांच्या 'एज्युकेशनल आयडिअल्स ऑफ टागोर अँड गांधी : अे कंपॅरेटिव्ह स्टडी' या लेखाचा अनुवाद.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आतापर्यंत ज्यांनी या विषयाला हात घातला, त्यांनी त्यांतील साम्यस्थळांवर भर देण्याचाच अधिक प्रयत्न केला हे खरेच असेल. १९४७ मध्ये विश्वभारती विद्यापीठाच्या त्रैमासिकाने 'स्वतंत्र भारतातील शैक्षणिक आव्हान' या विषयावर एक विशेष अंक प्रकाशित केला. उद्देश असा होता की, या आव्हानाचे उत्तर सांगण्याऐवजी या समस्येची व्याप्ती दाखवून द्यावी. टागोर आणि गांधी यांच्या शिक्षणविषयक संकल्पना व त्यानुसार त्यांनी केलेले प्रयोग यावर अखिल भारतातील अनेक मोठमोठ्या थोर विद्वानांनी त्यात महत्त्वपूर्ण लेख लिहिले होते. या विषयावर ही जी चर्चा त्या वेळी सुरू झाली ती बरीच दिशादर्शक होती आणि आपली राष्ट्रीय शिक्षणपद्धती तयार करण्याच्या दृष्टीने ती तशी सुरू राहणे योग्य ठरले असते असे वाटते. दुर्दैवाने, नेहरूंच्या आधुनिकीकरणाच्या धोरणांच्या ओघात ही शैक्षणिक चर्चा थांबून गेली. गांधी व टागोर या दोघांचेही या चर्चेतील महत्त्व संपले आणि फक्त रस्त्यांना व इमारतींना दिलेल्या नावांपुरतेच ते शिल्लक राहिले. प्रत्येक शहरात आपल्याला महात्मा गांधी मार्ग वा रवींद्रभवन दिसतात. शिक्षणाचे राष्ट्रीय धोरण मात्र अजून वासाहतिक ढाच्याचेच राहिले आहे आणि अधिकाधिक पुस्तकी व अलगाववादी बनत आहे.

१९व्या शतकाच्या सुरुवातीला भारतातील अभिजनवर्गावर इंग्रजी शिक्षणाची जी मोहिनी पडली होती ती शतकाअखेर बरीच कमी झाली होती. इंग्रजी शिक्षणामुळे आपले उन्नयन होते आहे, नेत्रदीपक प्रगती होते आहे, या समजाचा भ्रमनिरास होऊ लागला होता. म्हणून इंग्रजी विद्या अजिबातच नाकारली असे नव्हे. १९वे शतक उलटता उलटता भारतातील शिक्षणविषयक चर्चेनेही एक निराळेच वळण घेतले. भारतीय जनमानसावर आता मेकॉलेचे अधिराज्य नव्हते, राष्ट्राभिमानाने ती जागा घेतली. शैक्षणिक वादविवादात आता मातृभाषा व भारतीय संस्कृती यांना मानाचे स्थान मिळाले. आपल्या शिक्षणविषयक विचार मंथनाची सुरवातच टागोर व गांधी, दोघांनीही वासहतिक शिक्षणव्यवस्थेच्या समालोचनाने केली यात तसे आश्चर्यकारक काहीच नाही. एका राष्ट्रीय शिक्षणपद्धतीच्या उभारणीविषयी वाटणाऱ्या आत्यंतिक आस्थेनेच त्यांच्या शिक्षणविषयक आदर्शांच्या कल्पना विकसित होत गेल्या. शिक्षणविषयक व सामाजिक विषयांवरील त्यांच्या आरंभीच्या लिखाणातून हे स्पष्ट होते. टागोरांच्या १९०५ साली लिहिलेला *स्वदेशी समाज* हा लेख व गांधींचा *हिंद स्वराज्य* हा १९०८ चा लेख त्या संदर्भात बघण्यास उपयोगी आहेत. आत्मनिर्भर अशा ग्रामीण समाजाला जनचैतन्य देण्याची आस्था त्यात दिसते. *आत्मशक्ती* हाच स्वराज्याचा गाभा आहे यावर दोघांचाही जोर होता. इंग्रजी शिक्षणाचे दुष्परिणाम आणि मातृभाषेकडे होणारे दुर्लक्ष यांची दोघांनीही चर्चा केली आहे. परंतु आपण पुढे पाहणारच आहोत त्याप्रमाणे टागोर हे मूलतः कविहृदयाचे होते व राष्ट्राच्या सीमा ओलांडून विचार करण्यासाठी राष्ट्रवाद हा त्यांनी अजिबातच अमान्य केला. उलट पक्षी, गांधी हे एक राजकीय व्यक्तिमत्त्व होते. मानवी आयुष्याचा गाभा नैतिकतेत आहे. असा त्यांचा दृढ विश्वास होता. त्यामुळे सीमेपलीकडचा विचार हा भारतीय संदर्भात राष्ट्रवादाची भूमिका लक्षात घेऊनच करावयास हवा असे ते मानीत. राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या त्या महान काळातच हे दोघेही नेते प्रसिद्धीस आले हेही लक्षात घ्यावयास हवे. चमत्कार असा की, स्वातंत्र्योत्तर काळात दोघेही वस्तुसंग्रहालयातील पुतळे बनून राहिले.

टागोरांनी शिक्षणासंबंधी शंभरहून अधिक लेख लिहिले. त्या शिवाय, त्यांच्या इतर लिखाणातही शिक्षणविषयक कल्पनांचा, विचारांचा उल्लेख आढळतोच. त्यांच्या काही लिखाणात अनेक थोर शिक्षणतज्ज्ञांच्या, विशेषेकरून रूसो, ड्यूई यांच्या विचारांशी साम्य आढळते. पण तरीही त्यांचे म्हणून काही वेगळेपण, वैशिष्ट्य होतेच. त्यांच्या स्वतःच्या काही खास संकल्पना होत्या. त्या त्यांनी विकसित केल्या आणि शिक्षणविषयक संकल्पना व आदर्श यांच्या दुनियेत स्वतःचे एक खास स्थान निर्माण केले. यासारख्या छोट्याशा लेखात त्यांच्या शिक्षणविषयक सर्व विचारांचा नुसता उल्लेखसुद्धा अशक्यप्राय आहे. त्यांचे शिक्षणविषयक आदर्श समजावून घेण्याकरता आणि गांधीजींशी त्याबाबत तुलना करण्याकरता जे मुद्दे मला सर्वात महत्त्वाचे वाटतात, तेवढ्यांवरच मी जरा सविस्तर विचार करू इच्छितो.

शिक्षणावरील टागोरांच्या लेखांची तीन मोठ्या गटांत विभागणी करता येते. ज्या लेखांत त्यांनी वासहतिक इंग्रजी शिक्षणपद्धतीची चर्चा केली व तिच्या मर्यादा दाखवून दिल्या, त्यांचा समावेश होईल असा पहिला गट. उदाहरणार्थ, *शिक्षण हेरफेर* हा १८९३ चा, *शिक्षार बहन* हा १९१५ मधील लेख, *शिक्षार विकीरण* हे १९३३ साली कलकत्ता विद्यापीठात दिलेले भाषण किंवा १९३६ मधील, न्यू एज्युकेशन फेलोशिपच्या अंतर्गत दिलेले व्याख्यान. त्या व्याख्यानाचा विषय होता. 'शिक्षार स्वांगीकरण' आणि इतरही काही असेच लेखन. या लिखाणामध्ये







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यांनी मुख्यत: शिक्षणाच्या माध्यमाचा विचार केला. शिक्षणाच्या जागतिकीकरणाच्या समस्येचा विचार करताना माध्यमाची चर्चा केली आणि वासहतिक शिक्षणपद्धतीच्या आणखीही काही मर्यादा चर्चेत घेतल्या. मातृभाषेऐवजी इंग्रजी हे शिक्षणाचे माध्यम ठेवण्यास त्यांची नापसंती होती. मातृभाषेची बाजू त्यांनी मोठ्या जोशात भावनात्मक रीतीने मांडली. 'शिक्षाय मातृभाषा इ मातृदुग्धा'. (शिक्षणामध्ये मातृभाषा ही आईच्या दुधाप्रमाणे आहे.) किंबहुना, शिक्षणाच्या अगदी वरीष्ठ पातळीवरसुद्धा शिक्षणाचे माध्यम म्हणून मातृभाषाच असली पाहिजे असे त्यांचे मत होते. इंग्रजी भाषासुद्धा ते मातृभाषेतून शिकवीत आणि त्याकरता उपयोगी पडावे म्हणून *इंग्रजी सोपान* नावाचे एक सुरवातीचे पुस्तक त्यांनी लिहिले होते. बंगाली भाषिक मुलांकरता ही रीत तज्ज्ञांना खूपच उत्तम वाटली. बंगाली विद्यापीठ स्थापण्याचे त्यांचे स्वप्न होते. गडद अंधारातून जाणाऱ्या आगगाडीचे डबे दिव्यानी लखलखावे तशी परिस्थिती चालू शिक्षणपद्धतीची आहे असे त्यांना वाटे. भोवतालची अमाप जनता सोडून काही थोड्या विशेष व्यक्तीना शिक्षित बनवले जाते आहे. मातृभाषा हे शिक्षणाचे माध्यम झाल्याखेरीज शिक्षण सार्वत्रिक होऊ शकणार नाही, हे सार्वत्रीकरण इंग्रजी माध्यमाने साध्य होणार नाही असे त्यांचे ठाम मत होते. परीक्षा पास होण्याच्या दृष्टीतून दिलेले पुस्तकी शिक्षण हे केवळ पाठांतराला प्रोत्साहन देते. शिकवलेला भाग पाठ करणे आणि पुस्तकातून जसाच्या तसा उतरवणे यात तसा काही फरक नाही. कारण, घोटून पाठ करणारे केवळ पुस्तकात काय असेल तेच परत सांगू शकतात असे त्यांना वाटे.

हे ध्यानात घ्यावयास हवे की, गांधींचेसुद्धा वरील मुद्यांवर असेच विचार होते. परीक्षांवर जोर देणाऱ्या पुस्तकी शिक्षणाच्या तेही विरोधात होते आणि पढिक पाठांतर पद्धतीवरही त्यांचा राग होता. शालेय अभ्यासक्रमात फार पुस्तके अभ्यासाकरता लावू नयेत असे ते म्हणत. त्यांचा सल्ला असा की, आपल्यासारख्या गरीब देशात पुस्तके ही संख्येने कमीच आणि विचारपूर्वक निवडलेली असावी नाही तर गरीब विद्यार्थ्यांची शिक्षण मिळविण्याची संधी काढून घेतल्यासारखे होईल. मातृभाषा हेच शिक्षणाच्या अगदी वरच्या टप्यापर्यंत शिक्षणाचे माध्यम असणे जरूर आहे असे टागोरांप्रमाणे तेही मानत. परंतु शालेय अभ्यासक्रमात इंग्रजीचे स्थान काय असावे याबाबत मात्र, दोघांची मते अगदी भिन्न होती. गांधींच्या मताप्रमाणे विद्यार्थी चौदा वर्षांचा होईपर्यंत त्याला इंग्रजी शिकविण्याची काही जरूरी नाही आणि त्यानंतरसुद्धा सगळ्यांनीच इंग्रजी शिकले पाहिजे असे नाही. खरे तर, त्यांनी जी 'नई तालीम' नावाची शिक्षण प्रणाली विकसित केली होती, तीत इंग्रजीला स्थानच नव्हते. उलटपक्षी, इंग्रजी हा एक विषय म्हणून अगदी सुरवातीपासून शिकवणे जरूर आहे असे टागोरांना वाटे. शांतिनिकेतनमध्ये ग्रामीण विद्यार्थ्यांकरता म्हणून जी 'शिक्षा सत्र' नावाची व्यवस्था होती, तीत पहिल्या इयत्तेपासून इंग्रजी शिकवले जाई. एका तऱ्हेने, म्हटले तर हा प्रकार त्यानीच 'शिक्षार स्वांगीकरण'मध्ये केलेल्या उपदेशाशी विसंगत होता. त्यात त्यांनी म्हटले होते की, मातृभाषेतून दिलेले शिक्षण हे आईच्या दुधासारखे आहे. दुसऱ्या एका ठिकाणीही त्यांनी स्वत:चाच लहानपणचा अनुभव सांगून म्हटले की, विद्यार्थ्याला मातृभाषेची बऱ्यापैकी जाण आली म्हणजे मग इंग्रजी शिकवायला सुरवात करणे बरे पडेल. खुद्द टागोरही बंगाली चांगल्या तऱ्हेने शिकल्यावरच बारा वर्षांचे झाल्यानंतर इंग्रजी शिकू लागले होते.

गांधीजी मात्र या बाबतीत आमूलाग्र सुधारणावादी होते. इंग्रजी हा सक्तीचा विषय असणे किंवा शिक्षणाचे माध्यम असणे या दोन्हीलाही त्यांचा कटाक्षाने स्पष्ट विरोध होता. त्यांच्या मते, तुमच्या विचारसरणीत रेखीवपणा येण्यासाठी आणि स्वातंत्र्य ही संकल्पना मनात बिंबवण्यासाठी इंग्रजी भाषेच्या ज्ञानाचीच गरज आहे, ही जी अंधश्रद्धा आहे, ती हिंदुस्थानला ग्रासून टाकणाऱ्या अनेक अंधश्रद्धांमध्ये सर्वात बलवान आहे. ते आणखी म्हणतात की, आपल्याला राष्ट्रीय हाराकिरी करायची असेल तरच इंग्रजी हे आपल्या विचारांचे माध्यम असू द्यावे.

पुनरुज्जीवनवादी बंगाली अभिजनवर्ग आणि गांधी यांच्या विचारांमधील ही दरी लक्षात घेण्यासारखी आहे. राजेन्द्रलाल मित्र हे एक थोर विद्वान आणि बंगाली अभिजनवर्गाचे खरेखुरे प्रतिनिधी होते. ते एकदा म्हणाले की, इंग्रजी भाषेचा त्याग करणे म्हणजे केवळ बौद्धिक आत्महत्या करण्यासारखे आहे. उलटपक्षी, गांधींच्या मताप्रमाणे, राजा राममोहन राय हे अधिक कर्ते समाजसुधारक झाले असते किंवा टिळकजी अधिक गाढे विद्वान, अभ्यासक झाले असते, पण इंग्रजीतून विचार करायचा आणि इंग्रजीतूनच तो लोकांपुढे मांडायचा हा मोठा अडथळा त्यांच्या वाटेत आला. अर्थात, इंग्रजी साहित्यसंभाराच्या अभ्यासाचा त्यांना निश्चितच खूप फायदा झाला पण त्यांच्या त्यांच्या मातृभाषेच्या द्वारा त्यांना इंग्रजी साहित्याचा परिचय


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्हायला हवा होता. भाषांतरकर्त्यांची जात जन्माला घालून कोणत्याही देशाचे राष्ट्रात रूपांतर होत नाही. १९२१ सालच्या असहकार चळवळीच्या वेळी गांधी आणि टागोर यांच्या दृष्टिकोनांतील हा फरक अधिकच ठळक झाला. इंग्रजी शिक्षणाला गांधींनी जो पराकोटीचा विरोध केला आणि या वासहतिक शिक्षणपद्धतीवर बहिष्कार घालण्याचे आवाहन केले ते टागोरांना पसंत पडले नाही. जगदानंद रॉय यांना लिहिलेल्या पत्रात टागोरांनी राष्ट्रवादाची 'भौगोलिक भूत' अशी निंदा केली आहे. ते लिहितात की, सगळ्या जगाला या भुताची भीती पडली आहे. ते वेळेवारीच नष्ट करायला हवे. याच संदर्भात त्यांनी त्यांचा *शिक्षार मिलन* हा प्रसिद्ध निबंध लिहिला. या निबंधात त्यांनी पाश्चात्य आणि पौर्वात्य जगातील परस्परावलंबनावर जोर दिला आहे. त्यांच्या विश्वभारतीच्या संकल्पनेत हेच अनुस्यूत आहे.

टागोरांचे मत होते की, पाश्चात्यांकडून आपण आधुनिक विज्ञान व तंत्रज्ञान प्राप्त करून घेतले पाहिजे आणि पाश्चिमात्यांनी पौर्वात्यांकडून अध्यात्मज्ञान व त्यागवृत्ती मिळवावी. पाश्चात्यांच्या चंगळवादाचा त्यांना तिटकारा होता. गांधींचे असहकाराचे आवाहन, विशेषेकरून इंग्रजी शिक्षणाच्या बहिष्काराची मागणी हे एक प्रतिगामी, अपकर्षकारक पाऊल आहे असे टागोरांचे स्पष्ट मत होते. का, तर अशा असहकारामुळे आपल्या राष्ट्राच्या आयुष्यात नव्या वाऱ्यांची झुळुक येणारच नाही आणि आपले राष्ट्र म्हणजे एक तुरुंगच बनून राहील. गांधीजींनी त्यांना उत्तर दिले की, मलाही आमच्या घराच्या खिडक्या बंद करून आणि भक्कम तटबंदी उभारून घराचा तुरूंग बनवायचा नाही आहे. वेगवेगळ्या देशांतील निरनिराळ्या संस्कृतीचे वारे आमच्या घराभोवती फिरले पाहिजेत. पण त्या वाऱ्यांनी आमचे पाऊल जमिनीवरून सुटता कामा नये. इंग्रजी शिकण्याला माझा विरोध नाही. पण आमच्या शिक्षणपद्धतीवर त्याचे वर्चस्व राहाता कामा नये. म्हणून इंग्रजी हे शिक्षणाचे माध्यम झालेले मला चालणार नाही किंवा प्रत्येक विद्यार्थ्यावर इंग्रजीची सक्ती झालेलीही खपणार नाही.

त्या काळात टागोरांचा *शिक्षार मिलन* हा लेख वादाच्या भोवऱ्यात सापडला तेव्हा इतर लोकांनीही त्या वादात वाटा उचलायला सुरुवात केली. कादंबरीकार शरचंद्र चट्टोपाध्याय यांनी टागोरांच्या लेखाला अनुलक्षून *शिक्षार विरोध* नावाचा लेख लिहिला. त्या लेखातील मुख्य मुद्दा असा की, टागोरांना अभिप्रेत असलेले अन्योन्यसंबंध जुळून येणे अशक्यप्राय आहे. त्यांच्या मते पाश्चात्य लोक शास्त्रांचे नवीनतम ज्ञान व तंत्रविद्या तुम्हाला कधीच देणार नाहीत आणि तुमची त्यागवृत्ती व आध्यात्मिक ज्ञान यांचा त्यांच्या मनावर काही ठसा उमटणार नाही. उलटपक्षी, आमचे शोषण करण्यासाठी, आधुनिक विज्ञान आणि तंत्रज्ञान याकरता आम्ही त्यांच्यावर कसे सर्वस्वी अवलंबून राहू हेच ते पाहतील. वासहतिक शिक्षणपद्धतीवर बहिष्कार घाला या गांधींच्या आवाहनाला त्यांनी अनुकूल प्रतिसाद दिला व म्हटले की शाळेत हजर राहण्यापेक्षा केव्हा केव्हा शाळेवर बहिष्कार टाकण्यानेच, खरे शिक्षण मिळू शकेल. येथे आपल्याला Ivan Illich च्या 'Deschooling Society' या पुस्तकाची आठवण व्हावी. टागोरांच्या शिक्षणविषयक विचारांसंबंधित लेखांचे एक पुस्तक सत्येन्द्रनाथ रॉय संपादन करीत होते. त्यांच्या मतेने टागोर आणि शरचंद्र दोघेही आपापल्या परीने बरोबरच होते. टागोरांच्या शिक्षणविषयक कल्पनांना तत्त्वज्ञानाचा पाया होता आणि वैश्विक दृष्टिकोनातून ते विचार करीत होते तर शरच्चंद्रांच्या विचारांना त्या काळच्या राजकीय वास्तवाचा संदर्भ होता. तरी पण हा मुद्दा तितकासा खात्रीशीर वाटत नाही. त्यांच्या वेळच्या ज्वलन्त राजकीय समस्यांना *शिक्षार मिलन* हा टागोरांचा एक प्रतिसादच होता. शरचंद्रांनी आपल्या *शिक्षार विरोध* या लेखात जे वादाचे मुद्दे मांडले ते आजच्या भारतीय अर्थव्यवस्थेचा कल पाहता बरोबर ठरतात. सत्येन्द्रनाथ रॉय यांनीही कबूल केले की, आजचा आपला अनुभव लक्षात घेता शरच्चंद्रांच्या शंकाकुशंका बरोबरच होत्या. स्वातंत्र्यप्राप्ती-नंतर तर आर्थिक आणि सांस्कृतिक जीवनात सर्वत्रच परावलंबनाच्या रोगाने भारताला ग्रासले आहे. गुंतागुंतीची रचना असलेली इलेक्ट्रॉनिक साधने सोडाच, पण साधे दाढीचे पाते बनवण्याचे तंत्रज्ञानही आपण विकसित करू शकलो नाही यात आश्चर्य ते काय? जागतिकीकरणाच्या नावाखाली अमेरिका व इतर प्रगत युरोपीय राष्ट्रे यांनी भारत ही कायमची वसाहतच बनवली आहे. इलेक्ट्रॉनिक संपर्कमाध्यमांमुळे तर आपली राष्ट्रीय संस्कृती नाश पावते आहे आणि तथाकथित प्रगत राष्ट्रांची अत्यंत रासवट अशी भांडवलदारी संस्कृती इथे फोफावते आहे.

ज्यावर आपला काही ताबा राहू शकत नाही असा मार्ग आपण पकडला तर जे काय घडेल त्याची कुशंका भारतीय नेत्यांमध्ये कदाचित केवळ एकट्या गांधींनाच आली होती. आधुनिकीकरणाच्या नावाखाली जो विकासाचा मार्ग आपण धरतो आहोत. त्याची तार्किक परिणती काय होईल याचा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अदमास गांधींच्या दूरदृष्टीला आला होता. विकासाची प्रक्रिया ही सतत चालणारी आहे असे मानण्यातील चूक त्यांना जाणवली होती. युरोप आणि अमेरिकेने जी आधुनिकीकरणाची प्रक्रिया स्वीकारली तीतील अपुरेपणा व जुलूमीपणा त्यांना दिसत होता. त्या राष्ट्रांनी जो मार्ग चोखाळला त्याचेच आंधळे अनुकरण करण्याऐवजी काही पर्यायी मार्गाचा विचार करणारे कदाचित ते एकटेच नेते होते. खेडेगावावर आधारित अर्थव्यवस्था व श्रमावर आधारित शिक्षण हा मानवतेच्या भविष्याकरता शोधलेला पर्याय होता. शिक्षण हा त्यांच्या एकूण राजकीय कार्यक्रमाचाच एक भाग होता. मानवी मूल्यांचे स्वातंत्र्य मिळवण्याची राजकारण ही एक रीत होती.

गांधीजींना 'स्वराज्य' म्हणजे केवळ राजकीय स्वातंत्र्य अभिप्रेत नव्हते. आम जनतेला भावणाऱ्या रीतीने स्वयंशासन असा त्यांचा 'स्वराज्या'चा अर्थ होता. सर्व जनतेचे कल्याण देशभक्तीमध्ये गृहीत होते. त्यांच्या मते लुबाडणुकीवर आधारित समाज स्वराज्य प्राप्त करणेच शक्य नाही. त्यांच्या विचाराने, आम जनतेला स्वराज्य प्राप्ती होण्यासाठी, तिच्याकरता एक राष्ट्रीय शिक्षण पद्धती आचरणे आवश्यक आहे. त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर "ही स्वराज्यप्राप्तीची वाटचाल मोठी कष्टाची आहे. त्याकरता खूपच बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष पुरवावे लागते. सगळ्या गोष्टी जुळवून आणण्याची मोठी क्षमता लागते. ग्रामीण जनतेच्या सेवेकरता खेडोपाडी राहिले पाहिजे. दुसऱ्या शब्दांत असे म्हणावे की, राष्ट्रीय शिक्षण म्हणजे अखिल जनतेचे शिक्षण. राष्ट्रीयत्वाची जाणीव सगळ्या लोकात जागवणे म्हणजे शिक्षण". शिक्षणासंबंधीचे गांधींचे आदर्श त्यांच्या स्वराज्याच्या संकल्पनेतच अनुस्यूत होते.

टागोरांनासुद्धा खेडूत जनतेला आत्मशक्तीचे भान यावे व त्यांनी मुक्तता मिळवावी असे वाटत होतेच. त्यांनी त्यासाठी ग्रामीण जनतेकरता समाजकल्याणकारी व रचनात्मक कार्यावर भर दिला. त्यांचा जोर स्वावलंबन व आत्मविश्वास यावर होता. त्यांनी आपले शिक्षणविषयक प्रयोग शहरापासून दूर आणि निसर्गाच्या सान्निध्यात बोलपूरसारख्या ठिकाणी सुरू केले यातूनच त्यांची पसंती लक्षात यावी. टागोरांचे शिक्षणविषयक विचार त्यांच्या लिखाणाच्या दुसऱ्या गटात असलेल्या, १९०९ मध्ये लिहिलेले *तपोवन*, १९२४ मधील 'A poet's school', १९३६ मधील *आश्रमेर रूप और विकास* आणि *विश्वभारती* या पुस्तिकेत छापलेले आणखी इतर लेख अशा लेखनातून अधिकाधिक स्पष्ट होत गेले आहेत. तिसऱ्या गटातील लेखनात *शांतिनिकेतन विद्यालयेर शिक्षादर्श* या पुस्तकातील लेखांचा आणि शांतिनिकेतन आश्रमाचे कार्य कशा रीतीने चालावे या संबंधात आश्रमवासी, नातेवाईक व मित्र यांना लिहिलेल्या अनेक पत्रांचा समावेश होतो.

मला वाटते, टागोरांच्या शिक्षणविषयक विचारांची, धोरणांची मूलभूत तत्त्वे त्यांच्या *तपोवन* या निबंधात सापडतात. उपनिषदांच्या चिंतनातून त्यांची तत्त्वज्ञान विषयक भूमिका तयार झाली होती. आणि या भूमिकेचा त्यांच्या शैक्षणिक आदर्शांवर ठसा होता. संस्कृत वाङ्‌मयात, विशेषतः कालिदासाच्या वाङ्‌मयातून उल्लेखिलेल्या प्राचीन गुरुशिष्यपरंपरेचा टागोरांवर निःसंशय खूपच प्रभाव होता. तपोवन, तपस्या, आश्रम, संगम अशा कळीच्या शब्दांवरून त्यांची विचारधारा समजते. ते शब्द त्यांनी सहज जाता जाता वापरलेले नसून बुद्ध्याच योजलेले आहेत. निसर्गाशी मानवाचा हार्दिक संबंध जुळला पाहिजे हा त्यांच्या शैक्षणिक विचारांचा गाभा आहे. अदूषित निसर्गाच्या सान्निध्यात, पूर्ण स्वतंत्र वातावरणात मुलांची वाढ व्हावी अशी टागोरांची धारणा होती. शेले, वर्डस्वर्थ अशा रोमॅन्टिक कवींचे काव्य व रुसोचे साहित्य यांच्या टागोरांवरील प्रभावात याचे धागे सापडू शकतील. शिक्षणाच्या दृष्टीने शहरांपेक्षा खेडेगावच अधिक उपयुक्त आहे असे रूसो व गांधी यांच्या प्रमाणे टागोरांचेही मत होते. या बाबतीत ते रोमॅन्टिक व्यक्तींचे मुकुटमणी होते. "शिक्षण घ्यायचे ते केवळ यंत्रोद्योगांना लागणारी कौशल्ये आत्मसात करण्यासाठी किंवा शाळाकॉलेजातील शिक्षा पास होण्यासाठी नव्हे तर खरे शिक्षण तपस्येने शुद्ध होऊन निसर्गाशी एकरूप झाल्याने तपोवनातच मिळू शकेल". ते पुढे म्हणाले, "आमच्या विद्यालयातील शिक्षण केवळ ज्ञानेंद्रियांचे नसेल, केवळ ज्ञानप्राप्तीकरता नसेल तर 'बोध' शिक्षणालाही त्यात स्थान असेल". ते लिहितात, "आपल्या मनाला जी स्वातंत्र्याची आस असते. तिच्या स्मृतीतून आमच्या शाळेची स्थापना झाली आहे... निसर्गाचे ज्ञान प्राप्त करून नव्हे तर त्यांचा एक भाग असण्याच्या जाणिवेतून या संपूर्ण जगाशी जो आपले सुसंवाद स्थापित होतो, ते खरे स्वातंत्र्य". आपल्या शैक्षणिक कार्यासंबंधी त्यांनी लिहिले की, "मी आपली संस्था शहरापासून खूप दूर एका निसर्गरम्य सुंदर स्थळी उभारली. तेथे प्राचीन वृक्षांच्या छायेत आणि क्षितिजापर्यंत पसरलेल्या शेतांच्या जवळ, मुलांना शक्य तेवढा स्वतंत्रपणा मिळेल अशी ती जागा होती...


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पहिल्यापासूनच माझा प्रयत्न होता की, शाळेच्या वर्गापेक्षा हे वातावरण फार निराळे राहिले पाहिजे."

परंतु शांतिनिकेतनकडून टागोरांची निराशाच झाली. त्यांच्या कल्पना तेथे मूर्त होऊ शकल्या नाहीत. त्यांच्या मते, मुलांच्या पालकांनी परीक्षापद्धती सुरू करण्यासंबंधी जो आग्रह धरला, त्यामुळे शालेय वातावरणातील स्वाभाविकता आणि स्वतंत्रता यांच्यावर थोडा परिणाम घडलाच. विद्यालयाच्या आर्थिक समस्या सोडविण्यासाठी सधन कुटुंबातील मुलांना शाळेत प्रवेश देणे भाग होते. मुलांच्या जीवनातील उत्कर्षाबाबत पालकांना चिंता वाटत होती म्हणून परीक्षा घेण्याविषयी ते आग्रही होते. आपला हा प्रयोग चालू ठेवण्यासाठी टागोरांनी १९२४ मध्ये आणखी एक शाळा सुरू केली. जी अनाथ होती अशी काही मुले व ज्यांच्या पालकांना आपली मुले कोणत्याच शाळेत पाठविणे शक्य नव्हते अशी काही मुले घेऊन ही शाळा सुरू झाली. आर्थिक अडचणींमुळे पुष्कळ मुले सुरवातीस दाखल करून घेणे त्यांना शक्य झाले नाही. या शाळेविषयी टागोरांना फार आशाआकांक्षा होत्या. Elmhirst यांना १९ डिसेंबर १९३७रोजी लिहिलेल्या पत्रात ते लिहितातही की या 'शिक्षा सत्र' शाळेतील शिक्षणाला माझ्या दृष्टीने शांतिनिकेतनमधील शाळाकॉलेजातील शिक्षणापेक्षा अधिक महत्त्व होते. शांतिनिकेतनमधील शिक्षण दिवसेंदिवस देशात अन्यत्र असलेल्या शाळाकॉलेजांसारखेच होऊ लागले आहे. ती पद्धती म्हणजे जणू काही उसनवारीने आणलेले पिंजरे, ज्यात मुलांचे व्यक्तिमत्त्व पकडून ठेवलेल्या पक्षासारखे कोंडून ठेवायचे. त्या मुलांच्या बुद्धीची किंमत कशी ठरणार? तर या भूमीला परक्या अशा शिक्षणक्रमातील ठरवून दिलेल्या पाठांची पोपटपंची करून! 'शिक्षा सत्र'मधून आपली शिक्षणविषयक संकल्पना छान स्पष्ट होईल असे त्यांना वाटत होते. पण तसे घडले नाही.

सुनीलचंद्र सरकार यांच्या म्हणण्याप्रमाणे 'श्रीनिकेतन'च्या शिक्षणात निराळेपणा कशात होता? तर तेथे भोवतालच्या जगाचा थेट अनुभव मिळावा म्हणून व्यवसायप्रात्यक्षिकावर बराच भर दिला जात असे. इथे हे लक्षात घ्यायला हवे की, L.K. Elmhirst यांनी यापूर्वीच *शेतकी विद्यालय* या संस्थेचा संचालक म्हणून ग्रामीण पुनर्रचनेचा प्रयोग सुरू केला होता व त्या संस्थेचे टागोर अध्यक्ष होते. या श्रीनिकेतनच्या प्रयोगकाळात टागोरांचे लक्ष ग्रामविकासाकडे होते. तो विकास त्या त्या ठिकाणच्या विशिष्ट गरजांनुरूप आणि स्वावलंबन व सहकार यांच्या माध्यमातून घडावा अशी दृष्टी होती. असे दिसते की, या काळात ड्यूई यांच्या संकल्पना व प्रयोग यांचा टागोरांवर प्रभाव असावा. Elmhirst हे ड्यूई यांच्या विचारपरंपरेतील होते. त्यांच्यामुळे ड्यूईंच्या विचारांच्या संपर्कात टागोर आले असावेत. श्रीनिकेतनच्या प्रयोगातील स्फूर्तिदाते टागोर असू शकतील पण डोके मात्र Elmhirst यांचेच चालत असे. हे मात्र लक्षात घेण्यासारखे आहे की, श्रीनिकेतनचा प्रयोग सोडला तरी टागोरांच्या शैक्षणिक आदर्शांच्या पायाभूत कल्पना, तत्त्वे मात्र सुरवातीला त्यांनी *तपोवन* या निबंधात मांडली होती, ती या सर्व काळात तशीच राहिली. *तपोवन* या १९०९ साली लिहिलेल्या व *आश्रमेर शिक्षा* या १९३६ साली लिहिलेल्या त्यांच्या निबंधामध्ये मूलभूत असे फरक काही नाहीत. त्यामुळे श्रीनिकेतनचा प्रयोग हा टागोरांच्या शैक्षणिक प्रयोगाला महत्त्वाच्या कळीचा भाग असे मानले जात नाही यात आश्चर्य नाही. लोक तर त्या प्रयोगाला मूळ प्रयोगाची पुरवणी असेच समजतात.

उपनिषदांतील तत्त्वज्ञान ज्यात गुंफलेले, अनुस्यूत आहे अशा *नैवेद्य* या काव्यमालिकेची रचना टागोर करीत होते. त्यावेळीच १९०१ मध्ये बोलपूर येथे त्यांनी ब्रह्मचर्य विद्यालय स्थापन केले हे लक्षणीय आहे. याच सुमारास १९०२ साली ब्रह्मबांधव उपाध्याय यांनी टागोरांना *गुरूदेव* म्हटले आणि ही उपाधी टागोरांना जन्मभर चिकटली. या काळात शाळेसंबंधीचे नियम तयार करताना वैदिक संहितेचे आदर्श पाळावे असेही टागोरांच्या मनात होते. मनोरंजन बंदोपाध्याय यांना लिहिलेल्या पत्रात त्यांनी स्पष्टच म्हटले आहे, "हिंदू धर्मशास्त्राच्या विरोधी असे काहीही आश्रमशाळेत असू नये. संहितेत सांगितल्याप्रमाणे, आपल्या ब्राह्मण शिक्षकांना विद्यार्थ्यांनी पायाला हात लावून प्रणाम करावा तर ब्राह्मणेतर जातींच्या शिक्षकांना नुसते हात जोडून नमस्कार म्हणावे". सन १९०९ मध्ये लिहिलेल्या *तपोवन*मध्ये त्यांनी आपली शिक्षणविषयक संकल्पना व उद्दिष्टे स्पष्ट केली आहेत. उघडच, औपनिषदिक तत्त्वज्ञान हाच त्या निबंधाचा गाभा आहे. त्या आधी काही वर्षे, १९०४ मध्ये त्यांनी *स्वदेशी समाज* या निबंधात त्यांनी ग्रामजीवन उद्ध्वस्त होण्याची कारणे हुडकून शोधून मांडली होती व त्यामुळे वाटणारी चिंता व्यक्त केली होती. ग्रामीण जीवनाच्या पुनर्बांधणीकरता त्यांनी काही ठोस उपायही सुचविले होते.

परंतु, १९११ च्या सुमारास ब्राह्मणी कर्मकांडा-विषयीच्या त्यांच्या दृष्टिकोनात फरक पडलेला दिसतो. त्या वर्षी त्यांनी



अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

*अचलायतन* नावाचे नाटक लिहिले. धर्माची मूळ तत्त्वे बाजूला सारून कर्मकांडावर जोर देणाऱ्या दुराग्रही पुरोहित वर्गाची त्यात त्यांनी चेष्ट केली होती. यामुळे आपल्या संबंधी काही गैरसमज पसरू नये याकरता, ललितकुमार बंदोपाध्याय यांनी या नाटकावर केलेल्या टीकेला टागोरांनी एक प्रत्युत्तर प्रसिद्ध केले. त्यात या नाटकाचा संदेश काय याचा खुलासा होता. त्यात ते म्हणतात की, आपण मंत्र किंवा धर्मकृत्ये यांच्या विरोधी आहो असे नव्हे. ज्या धार्मिक कृत्यांचा ज्ञानाचा शोध घेण्यास व बौद्धिक मेहनतीस अडथळा होतो ती नक्कीच दोषास्पद आहेत. पण ज्या आर्थिक कृत्यांची मदत आपले मानसिक क्षितिज विस्तारायला व ज्ञानजिज्ञासा वाढायला होते ती स्तुतीपात्र आहेत हे निर्विवाद. *बलाका* या १९१६ साली लिहिलेल्या काव्यसंग्रहाच्या आगेमागे लिहिलेल्या कवितांतून हा नवीन दृष्टिकोन चांगला स्पष्ट होतो. *बलाकां*मध्ये यौवन व साहस यांची गाणी आहेत, त्यात राष्ट्रवादावर भौगोलिक भूत अशी टीका आहे आणि वैश्विक आदर्श अशी मानवतेची भलावण आहे. याच वेळी पाश्चात्य संस्कृतीच्या संकुचितपणावर टीका आहे आणि औपनिषदिक तत्त्वांपासून ते दूर गेलेले नाहीत.

त्यात विशेष मनोरंजक भाग असा की, १९२० च्या दशकामध्यात, जेव्हा श्रीनिकेतनचा प्रयोग प्रगतिपथापर होता, तेव्हा त्यांची दोन प्रसिद्ध नाटके, १९२२ साली *मुक्तोधारा* व १९२४ साली *रक्तो करावी* त्यांनी लिहिली. यंत्रसंस्कृतीसंबंधात त्यांना थोडी शंका असलेली या नाटकात दिसते. निसर्गावर या यंत्रविषयक तंत्रज्ञानाचा वरचष्मा होतो आहे अशी काळजी या दोन्ही नाटकात दिसते. या तंत्रज्ञानावर भर देणाऱ्या समाजाची शोषक वृत्ती त्यांना नापसंत होती हे उघड दिसते. १९३० साली ते रशियाला गेले होते. त्यानंतर लौकरच १९३३ साली *शिक्षार विकीरण* हा व १९३६ साली *शिक्षा स्वांगीकरण* असे दोन प्रसिद्ध लेख त्यांनी लिहिले. पूर्वीपासूनच्या त्यांच्या अनेक कल्पना ज्या त्यांना आजही समर्पक, उचित आहेत असे वाटत होते, त्या त्यांनी या लेखात पुनः वापरल्या आहेत, किंबहुना, त्यांची जी विशेष प्रसिद्ध अवतरणे, विद्वान उद्‌धृत करीत असतात, ती जास्ती करून या लेखांमधीलच आहेत. अगदी सुरवातीचा *शिक्षार हेरफेर* हा लेख व हे दोन लेख यातील प्रतिपादनात तसा म्हणण्यासारखा फरक नाही. तसेच, *तपोवन* व १९४१ मधील *आश्रमेट शिक्षा* यातही मूलभूत वेगळेपणा काही नाही. 'टागोरांच्या शिक्षणविषयक कल्पनांमध्ये काही बदल घडला आहे काय ते शोधून काढणे कठिणच आहे' असे विश्वभारतीचे एक पूर्व उपाचार्य म्हणाले आहेतच. आता असेही असू शकेल की, जसजशा गुरुदेवांच्या शिक्षणविषयक कल्पना विकसित होत गेल्या. तसतसे संदर्भानुरूप या किंवा त्या पैलूंवर अधिक भर दिला जात असेल.

१९४७ मध्ये विश्वभारती त्रैमासिकाचा एक विशेषांक प्रसिद्ध झाला. त्यात अनाथनाथ बसू व सुनीलचंद्र सरकार यांचे, टागोर व गांधी यांच्या शिक्षणविषयक कल्पना व त्यांचे शिक्षणविषयक प्रयोग यांचा तुलनात्मक अभ्यास करणारे दोन लेख प्रसिद्ध झाले. दोन्हीही अध्ययनांतून त्यावर चांगला प्रकाश पडतो. परंतु त्या दोघांच्या कल्पनेत जे मतभेद आहेत ते जरा बेताबेतानेच प्रकट केले आहेत. सरकार लिहितात की, दोन्ही पद्धतींच्या तुलनात्मक अभ्यासातून त्यातील रक्ताचे नाते असावे असे वाटण्याइतकी साम्यस्थळे त्यांत दिसतात, तर जे फरक दृष्टोत्पत्तीस येतात ते दूर करणे अजिबातच अशक्यप्राय आहे असे नाही. दोघांतील मतभेदांचे प्रमुख मुद्दे बसूंनी अशा तऱ्हेने जुळवून घेण्याचा प्रयत्न केला. ते म्हणतात, 'क्रियाशीलतेच्या तात्त्विक मुद्यांवर दोन्ही पद्धतीत एकमत आहे. परंतु टागोरांनी आपल्या मूलभूत अभ्यासक्रमात क्रियाशीलतेचे तत्त्व अधिक जाणीवपूर्वक वापरलेले आहे आणि अभ्यासक्रमाशी एकजीव केलेले आहे. तरी त्या तत्त्वाच्या विस्तारपूर्वक खुलासा करून त्याच्याभोवती अभ्यासक्रमाची सुसंगत मांडणी ते करीत नाहीत. या ठिकाणी दोघांत फरक पडतो. याचे कारण, टागोरांना शिक्षणाचे तत्त्वज्ञान मांडावयाचे होते, अभ्यासक्रमाची मूलतत्त्वे सांगावयाची नव्हती." हा युक्तिवाद बिलकुल पटण्यासारखा नाही. गांधींच्या दृष्टीने मुद्दा होता तो केवळ कृतिशीलतेचा आणि त्यावर आधारित अभ्यासक्रमाचा नव्हता. त्यांना अधिक काहीतरी म्हणावयाचे होते. गांधींच्या शिक्षणक्रमात उत्पादक व्यवसायाला महत्त्व होते आणि तो व्यवसाय पुरेसा रोजगार देणारा असावा अशी त्यांची मनीषा होती. गांधींच्या मताप्रमाणे, हस्तकलेचे शिक्षण द्यावयाचे ते केवळ शाळेच्या वस्तुसंग्रहालयात प्रदर्शनीय वस्तू ठेवण्यासाठी नव्हते. ज्यांना बाजारात काही किंमत नाही अशी खेळणी बनविण्यासाठीही नव्हते. त्यांचे म्हणणे, या शिक्षणातून बाजारात खपण्यासारख्या वस्तू निर्माण करता याव्या असे होते. कारखान्यांची सुरवात झाली तेव्हा लहान मुलांकडून फटके मारून काम करून घेतले जाई. तशा प्रकारे मुलांनी काम करावे असे अर्थातच ते मानीत नसत. आपल्या कामातून

मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

मुलांना आनंद व्हावा आणि त्यांच्या बुद्धीला चालना मिळावी अशी त्यांची दृष्टी होती. गांधींचा जो राजकीय कार्यक्रम होता त्याचा *मूलोद्योग शिक्षण* हा एक घटक होता. त्यांना असे वाटत होते की, आजच्या शिक्षणपद्धतीत तीन महत्त्वाचे दोष आहेत.

पहिला म्हणजे त्या पद्धतीचा पाया एक परकीय संस्कृती आहे आणि स्थानिक संस्कृतीला त्यातून पूर्णपणे वगळले गेले आहे.

दुसरा दोष असा की, हृदय व काम करणारे हात यांच्या सांस्कृतिक संवर्धनाकडे त्यात लक्ष दिलेले नाही.

तिसरा असा की, परक्या भाषेतून खरे शिक्षण देणे केवळ अशक्य आहे.

१९२१ साली 'Young India' च्या एका अंकात त्यांनी लिहिले की, त्यांच्या दृष्टीसमोरील शिक्षणपद्धतीत पुढील तीन गोष्टींचा अंतर्भाव असावा असे योजले आहे. एक, शिक्षणाचा खर्च शिक्षणातूनच भागावा. दोन, शिक्षणाने मुलांचे मन व शरीर या दोहोंचा विकास घडवून आणावा. आणि तीन, यातून, परदेशी सूत व कापड यावर बहिष्कार घालण्याचा मार्ग सुकर व्हावा. अशा रीतीने तयार झालेला मुलगा आत्मनिर्भर व स्वतंत्र होईल. पुढे त्यांनी असे म्हटले आहे, "अशा शाळांमध्ये शेत नांगरणे हा सुद्धा खेळाचाच भाग होईल. आमच्या मुलांना फूटबॉल अथवा क्रिकेट यासारखे खेळ मिळाले नाहीत तर त्यांचे आयुष्य अगदी नीरस होईल ही कल्पना संपूर्णतया चुकीची आहे". गांधींनी लिहिले आहे, "माझी योजना अशी की, प्राथमिक शिक्षण द्यावयाचे ते सूत कातणे, पिंजणे यांसारख्या ग्रामीण हस्तकलांतून द्यावे. यातून एक शांततामय समाजक्रांती घडून येईल आणि तिचे फार दूरगामी परिणाम होतील."

आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी शाळा या गोष्टीवर गांधींचा जो भर होता. तो टागोरांना स्वीकार्य नव्हता. ती संकल्पना त्यांनी बाजूस सारली. २९ डिसेंबर १९३७ या दिवशी कलकत्ता विद्यापीठाच्या सेनेट हाऊसमध्ये 'एज्युकेशन फेलोशिप'ची जी सभा झाली तिला त्यांनी आपले वरील मत लेखी कळविले. त्यांना असे वाटले की, मूलोद्योग शिक्षणाची प्रणाली व्यक्तित्वाच्या विकासाऐवजी भौतिक गरजांवर अधिक भर देत होती. ज्या पद्धतीत खेळणे, कुदणे याऐवजी अर्थोत्पादक कामांचा समावेश केला गेला आहे आणि मुलांनी स्वश्रमाने केलेल्या उत्पादनाचा काही हिस्सा शिक्षकांना मिळणार आहे अशा पद्धतीला पाठिंबा देणे त्यांना शक्य झाले नाही. जीवन आणि श्रम यांच्याकडे पाहण्याच्या गांधी आणि टागोर यांच्या दृष्टिकोनातील फरक या ठिकाणी कोणासही दिसेल. हा फरक अधिक लक्षणीय वाटतो. तो अशा करता की, वर्ध्याला परिषदेत झाकीर हुसेन यांनी सुद्धा आपली भीती पुढीलप्रमाणे व्यक्त केली. "परिणामी असे घडेल की, शिक्षक हे गुलामांचे रखवालदार होऊन गरीब बिचाऱ्या मुलांची पिळवणूक करतील. जर असे घडले तर पुस्तकांपेक्षा टकळी अधिक घातक ठरेल आणि एका अदृश्य गुलामगिरीचा पाया आम्ही या देशात घालू". के.टी. शहासुद्धा म्हणाले, "धोकंपट्टी ही जी आजची एक दुर्दैवी गोष्ट आहे, तिच्या ऐवजी अधिक वाईट अशी गोष्ट येईल. कामाचा बोजा वाढणे आणि विद्यार्थ्यांकडून गैरवाजवी श्रम करून घेणे या गोष्टी बिनबोभाट पण निश्चितपणे शिक्षणात शिरतील. शिक्षणाचा खरा हेतू पाठीमागेच राहील". आपल्या आर्थिक व्यवस्थेत जे बदल घडावयास हवेत त्याबाबत, खरे म्हणजे, या दोघांचे गांधींशी मतभेद होते. शहांनी म्हटले आहे, शारीरिक श्रमांवर भर देणे हे ठीक आहे. पण आपण यंत्रयुगात राहतो आहोत हे विसरता कामा नये. जर तुम्ही हातांनी काम करण्यावर फार भर दिलात आणि यंत्राला दूर ठेवलेत तर ते देशाच्या आर्थिक सुस्थितीला घातक ठरेल. स्वावलंबी शिक्षणयोजनेची गांधींची योजना पातळ झाली यात नवल नाही. गांधींनी दिलेल्या सावधानतेच्या इशाऱ्याविरुद्ध हे होते. इशारा असा : जर तुम्हाला खरोखर असे वाटत असेल की, यंत्रांचा उपयोग अनिवार्य आहे तर माझी योजना फेटाळावयास हवी आणि तिच्याऐवजी दुसरी सुचवावयास हवी.

गांधींच्या या योजनेचे महत्त्व समजण्याकरता या स्वावलंबी शिक्षणपद्धतीविषयी थोडी माहिती मिळवणे जरूरीचे ठरावे. कष्टकरी लोकांच्या दृष्टिकोनातून शिक्षणाकडे पाहणारा गांधी, कदाचित केवळ एकटे गांधीच, हा एक भारतीय नेता होता. यातच गांधी व इतर पुढारी यांतील फरक लक्षात यावा. गांधींचा हा विश्वास बरोबर होता की, कष्टकरी कुटुंबातील मुले, हातातोंडाची गाठ पडावी म्हणून आईवडिलांना खुशीने मदत करतात. त्यांना माहीत असते की काय केले नाही तर अन्न मिळणार नाही. खरे तर, उत्पादक श्रमांच्या द्वारा शिक्षण देण्याची गांधींची योजना जर जागतिक पातळीवर अंमलात आणली असती. तर शेतीवर निर्वाह करणाऱ्या समाजातील बालकामगार केव्हाच मुक्त झाले असते. उत्पादनाच्या साखळीत शेतमजुरांचे

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्थान बळकट झाले असते. शेतजमिनींच्या मालकांविरुद्धच्या त्यांच्या लढ्यात त्यांना भक्कम आर्थिक पाया लाभला असता. आपल्या शैक्षणिक योजनेचा हा पैलू गांधींनी प्रकाशात आणला नाही. त्याचे कारण कदाचित त्यांच्या अहिंसेच्या तत्त्वज्ञानात असेल. अहिंसेच्या तत्त्वज्ञानात वर्गसंघर्ष तीव्र होऊ देण्यास मान्यता नाही. पण त्यांनी हे नोंद करून ठेवले आहे की, अशा तऱ्हेने घडलेली मुले आत्मविश्वासायुक्त व स्वतंत्र वृत्तीची होतील. त्यांच्यामुळे घर आणि शाळा यात एक अखंड बंध जुळून येईल.

परंतु, गांधींचा यंत्रसंस्कृतीला असलेला विरोध समजण्या-सारखा असला तरी व्यवहारात आणण्याजोगा नव्हता. खरे म्हणजे, गांधींच्या इतर लिखाणावरून त्यांनाही हे अव्यवहारित्व उमगले होते असे लक्षात येते. ते यंत्रांच्या मर्यादित उपयोगाला अनुकूल होते. विशेषतः शिवणयंत्रा-सारखी यांत्रिक साधने, ज्यामुळे मानवी श्रम कमी दर्जाचे ठरणार नाहीत आणि त्या श्रमांच्या योगे एकूण उत्पादकता वाढेल अशा तऱ्हेची त्यांना मान्य होती. निसर्गाची शक्ती आणि मानवी श्रम यावर होणारी यंत्रांची कुरघोडी त्यांना मान्य नव्हती. आता हेही खरेच की, टागोरांचाही काही प्रमाणात यंत्रसंस्कृतीला विरोध होता. त्यांच्या *मुक्तोधारा* व *रक्तकटाथी* या नाटकांतून तो दिसतो. तात्त्विक दृष्ट्या दोघांच्याही यंत्रसंस्कृतीला, विशेषतः तिच्या पिळवणुकीच्या व चंगळवादाच्या पैलूंना विरोध होता. कदाचित असे असेल की टागोरांचे उपयुक्ततेकडे जास्त लक्ष होते त्यामुळे थोड्या प्रमाणात आधुनिकीकरणाला त्यांची तयारी होती. शेवटी, ते एक कवी होते आणि राजकीय तत्त्वज्ञानांच्या बाबतीत ते थोडे कच्चे होते. उलट पक्षी, गांधींनी आपली राजकीय तत्त्वप्रणाली मानवी श्रमाबाबतच्या नैतिकतेवर आधारली होती. कारण, त्यांना वसाहतवादी राजकारण आणि आर्थिक व सांस्कृतिक श्रेष्ठत्वाला पर्याय उभारायचा होता. श्रमजीवी लोकांच्या मानसिक विश्वाबाबत गांधींना एक गूढ संवेदना होती. शेतकरी समाजातील श्रमिकांच्या गरजा व आकांक्षा ज्यात ध्वनित होतील असे राजकीय तत्त्वज्ञान त्यांना अभिप्रेत होते. केवळ आपली श्रमशक्ती हेच श्रमिकांचे भांडवल असते. म्हणून गांधींचा शारीरिक श्रमांवरचा भर लक्षणीय आहे. मोठ्या प्रमाणावरचे उद्योग इतरांच्या श्रमाचे अपहरण करून आणखी लुबाडणूक करण्याकरता चाललेले असतात. श्रम ही विक्रेय वस्तू बनली म्हणजे तिचे अमानुषीकरण होते. गांधींना वाटे की आधुनिक यंत्रसंस्कृती ही नैतिक नाही आणि शेवटी ती जगाच्या अंताला कारणीभूत होणार आहे.

या बाबतीत सर्वांचेच गांधींशी एकमत होईल असे नाही. पण मानवी मूल्यांचा ऱ्हास व सांस्कृतिक अवनती ही औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या राष्ट्रात दिसून येतात हे काही नजरेआड करता येणार नाही. यात गुंतलेले मोठे प्रश्न आपण बाजूला ठेवले तरी आपल्यासारख्या देशात स्वावलंबनाधिष्ठित शिक्षणपद्धतीची किती गरज आहे ते इतिहासातून व चालू घडामोडींवरून सिद्ध झाले आहे. ज्या श्रीमंत पालकांच्या मुलांना आर्थिक कारणांकरता टागोरांनी आपल्या शांतिनिकेतनमध्ये प्रवेश दिला होता त्या पालकांच्या अतिआग्रही मागण्यांपुढे टागोरांना मान तुकवावी लागली हे शांतिनिकेतनचा प्रयोग फसण्याचे प्रमुख कारण होय. मजा अशी की, श्रीनिकेतनच्या प्रयोगाच्या वेळीही Elmhirst यांनी जे परदेशातून आर्थिक पाठबळ मिळवले त्यावर टागोरांना विसंबून राहावे लागले. याला C.F. Andrews यांची बहुधा संमती नव्हती. तथापि, श्रीनिकेतनचा प्रयोग का फसला याचे संपूर्ण सविस्तर विश्लेषण अजून विद्वानांनी केलेले नाही. श्रीनिकेतनच्या प्रयोगाचा मुख्य उद्देश ग्रामीण पुनर्रचना हा होता हे निःसंदेह आहे. टागोर म्हणतात, "मी माझ्या 'स्वदेशी समाज' या लेखात म्हटलेच आहे की, आपण आपले राष्ट्रीय पुनर्निर्माणाचे कार्य खेडे हा केंद्रबिंदू धरून योजले पाहिजे." तरीही सुधारीत कुक्कुटपालन, दुग्धोत्पादन, शेती वगैरे योजना राबवूनही श्रीनिकेतन स्वावलंबी होऊ शकले नाही. 'शिक्षासत्र' या टागोरांच्या दुसऱ्या शैक्षणिक प्रयोगाचे अगदी थोड्या कालावधीत एका सामान्य शाळेत रूपांतर झाले. टागोरांची अपेक्षा होती त्या उलट, शांतिनिकेतन विद्यालयाची नवनवीन प्रयोगशीलता केव्हाच संपली तरीही कलकत्त्यातील अभिजनवर्गाच्या पाठिंब्यामुळे विद्यालयाचे आकर्षण थोड्या प्रमाणात शिल्लक राहिले. पण शिक्षासत्र मात्र विस्मृतीत गडप झाले.

प्रसंगवशात, स्वातंत्र्याच्या ४९ वर्षांनंतरही भारताला आपल्या प्राथमिक शिक्षणाच्या खर्चा करता इतर राष्ट्रांपुढे भिकेची कटोरी घेऊन जावे लागते आहे. जागतिक बँकेच्या इशाऱ्यानुसार आपली शिक्षणपद्धती ठरवावी लागते आहे. यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही की जे बंगाली कम्युनिस्ट एके काळी कलकत्त्याच्या सगळ्या भिंती जागतिक बँकेला शिवीगाळ करणाऱ्या वाङ्मयाने रंगवीत असत व त्यांच्या



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वरिष्ठ अधिकाऱ्यांनी चालते व्हावे अशी घोषणाबाजी करत असत, तेच आज अचानक तोंड उलटे फिरवून त्याच अधिकाऱ्यांच्या स्वागतासाठी लाल गालिचे पसरत आहेत आणि त्यांची मदत मागताहेत. हे जरा चमत्कारिकच की, त्यांना या नवीन वाद्यमेळात आपला सूर मिसळून परकी-आर्थिक मदतीवर चाललेल्या प्राथमिक शिक्षणविषयक जिल्हायोजनेत सामील व्हावेसे वाटले. आणि जेव्हा प्राथमिक वर्गांकरता इंग्रजी पाठ्यपुस्तके तयार करायला ते ब्रिटिश तज्ज्ञांवर अवलंबून राहतात तेव्हा बंगाली कम्युनिस्टांचे बौद्धिक दारिद्र्य आणखीच स्पष्ट होते. शासनसंचालित प्राथमिक शिक्षणाचा हा बट्ट्याबोळ परदेशी मदतीने सुधारता येईल हा विचारच हास्यास्पद आहे. इतक्या मोठ्या प्रमाणावर एकदम इतका पैसा आत सोडला तर फारच संभव आहे की, शिक्षणपद्धतीत बोकाळलेला भ्रष्टाचार आणखीच फोफावेल व तळागाळापर्यंत पोचेल.

आत्मनिर्भर शिक्षणाविषयीच्या गांधींच्या योजनेची एकूण कल्पना काय होती हे इथे थोडक्यात पाहणे मुद्याला धरून होईल याचा अदमास घेण्याचा प्रयत्न करण्यात आला. असे दिसले की, शाळेच्या दुसऱ्या वर्षापासून आपल्या कामातून विद्यार्थी दर तासाला एक आणा मिळवू शकतो. त्याप्रमाणे, महिन्याला ६ रु. ८ आणे मिळवण्यासाठी त्याने महिन्यातील २६ दिवस रोज चार तास काम केले पाहिजे. मूलोद्योग शिक्षण योजनेत एका शिक्षकाचे दरमहा वेतन २५ रु. ठरविण्यात आले होते. जर २५ विद्यार्थ्यांनी त्यांच्या महिन्याच्या मिळकतीतून प्रत्येकी रु. २ दिले तर दोन शिक्षकांचा पगार भागविता येईल आणि तरीही विद्यार्थ्यांकडे दर महा ४ रु. ८ आणे शिल्लक राहतील. १९३० च्या सुमारास बंगालमध्ये शेतमजूर दरमहा रु. २० मिळवू शके. तागाच्या लागवडक्षेत्रात ही मजुरी जास्तीत जास्त रोज ११ आणे होई आणि कामे संपत आली म्हणजे ती रोज ३ आणे पर्यंत खाली येई. त्यांना शेतात सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत राबावे लागे, मध्ये जेवणाकरता अर्धा ते एक तास सुट्टी. पूर्व बंगालमध्ये त्या दिवसांत तांदूळ रुपयाला ७ शेर मिळत आणि बरद्वानमध्ये तर रुपयाला ११ शेर. तेव्हा असे सहज म्हणता येईल की एक विद्यार्थी महिन्याला मणभर (३८ किलो) तांदूळ मिळवू शके. शेतमजुराच्या कुटुंबाला ही मोठीच मदत म्हणायची. या कुटुंबातील मुले जर असे तांदूळ मिळवू शकली तर ती सकाळी उकड्या तांदुळाच्या भाताचे जेवण करून शाळेला येऊ शकतील. बंगालमधील ग्रामीण भागाच्या आर्थिक परिस्थितीची जाण असलेल्या लोकांना अशा प्राप्तीचे महत्त्व कळू शकेल. खाण्यासाठी पुरेसे अन्न मिळत असेल तर श्रमिकांच्या कुटुंबातील मुले असे काम आनंदाने करतील. त्यांना श्रमांची लाज वाटत नाही, त्यांना त्याची सवय असते. शेतकरी समाजात श्रम हे केवळ जगण्याचे साधन नसून ती जीवन रीतच असते. शेतकरी समाजातील श्रमसंस्कृतीची जाण असल्याशिवाय गांधींच्या शिक्षणपद्धतीची महती कळणे कठीण.

मला वाटते की साहस व क्रीडा हे टागोरांच्या शिक्षणविषयक योजनेचे प्रमुख घटक होते तर गांधींचा उत्पादक कामावर विश्वास होता. टागोरांना कामाचे रूपांतर खेळात करावे वाटे तर गांधींना कामातच खेळातील चैतन्य दिसे. निसर्ग व संगीत, नाटक, चित्रकला अशा सर्जनशील चळवळी टागोरांच्या मनातील योजनेत प्रमुख स्थान मिळवून होत्या. गांधींनीही संगीत व चित्रकलेचे महत्त्व ओळखले होते; पण हस्तकौशल्य व उत्पादक काम यातच त्यांना सौंदर्य दिसे. त्यांच्या विचारपद्धतीत सामाजिक, आर्थिक, राजकीय समस्यांचे धागे विणलेले असत. टागोरांच्या प्रकृतिधर्मानुसार त्यांना श्रममुक्तीची भलावण करावीशी वाटे तर गांधींच्या स्वभावाप्रमाणे ते श्रमप्रतिष्ठेला किंमत देत. या बाबतीत दोघांच्या जीवनविषयक दृष्टिकोनात मूलभूत फरक होता. तरीपण दोघेही प्रेम व स्वतंत्रता यांना सर्वात महत्त्व देत. दोघांनाही पाश्चात्य चंगळवाद नको होता. साधेपणा आणि शरीरश्रम हे गांधींच्या मानवी मूल्यांचे महत्त्वाचे पायाभूत घटक होते. टागोरांनाही राहणीचा साधेपणा व श्रमाची प्रतिष्ठा मान्यच होती. पण अर्थपूर्ण आयुष्याचा खरा गाभा कष्टांपासून मुक्ती संपादन करण्यात आहे असे त्यांचे मत होते. एका विद्वान गृहस्थांनी म्हटले आहे. ते खरेच की टागोरांचा भक्तिमार्ग होता तर गांधींचा कर्ममार्ग.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

टिपण

# परप्रांतीयांचा द्वेष राजकीय सोयीसाठी!

**प्रमोद बियाणी**

महाराष्ट्रातील प्रमुख शहरांमध्ये आणि विशेषतः मुंबईमध्ये परप्रांतियांचे जे लोंढे येऊन स्थिरावले आहेत त्याबद्दल अत्यंत तीव्र संताप सध्या व्यक्त होत आहे. उद्धव ठाकरे यांनी शिवसेनेत मुख्य स्थान पटकावल्यानंतर दोन मुद्दे मांडले. एक म्हणजे शिवशक्ती व भीमशक्तीचे एकत्रीकरण व दुसरे म्हणजे महाराष्ट्रावरील परप्रांतीयांचे अतिक्रमण! या दोन्ही विषयांनी महाराष्ट्राच्या सांस्कृतिक, सामाजिक व राजकीय वर्तुळात तावडतोब महत्त्वाच्या जागा पटकावल्या. या सर्व गदारोळात दोन गोष्टी निष्पन्न झाल्या त्या अशा : (१) रामदासजी आठवलेंची अस्तित्व बचाओ मोहीम सुरू झाली. (२) उद्धव ठाकरे हे बाळासाहेबांऐवढेच महत्त्वाचे व्यक्तीमत्व असल्याचे सिद्ध झाले. त्यांनी मुद्दा मांडायचा व शरद पवारांसह सर्वांनी त्यावर प्रतिक्रिया देत बसायचं! त्यामुळे आपोआपच उद्धवराव केंद्रस्थानी आले व इतर सर्वजण प्रतिक्रियावादी बनले.

मुंबईतल्या एका हौसींग सोसायटीत मांसाहारी व्यक्तीस सदनिका मिळणार नाही अशा स्वरुपाचा काही निर्णय झाल्यानंतर परप्रांतियत्वाच्या वादाला तोंड फुटले. मुंबईत मराठी माणसांवर होणाऱ्या अन्यायाच्या निर्मूलनार्थ शिवसेना स्थापन झाल्याने या विषयावरील वादाचे पितृत्व त्यांच्याकडेच जाणे अपरिहार्य होते. शिवाय गुजरात विधानसभा निवडणूकीच्या विजयानंतर नरेंद्र मोदींची मुंबईत जी सभा झाली व त्यात ज्या पद्धतीने गुजराती बांधवांनी गर्दी केली ती शिवसेनेला धोक्याची सूचनाच होती. त्यावेळी मोदींनी मुंबईत येऊन बाळासाहेबांची साधी भेटही घेतलेली नसल्याने मोदी, भाजप व त्यांचे गुजराती समर्थक यांना उत्तर देणे शिवसेनेला आवश्यकच होते. त्या बोचलेल्या मोदीसभेमुळेही परप्रांतीयांचा विषय शिवसेनेने पुन्हा ऐरणीवर आणलेला असू शकतो, यात समाजकारणापेक्षा शिवसेनेने राजकीय सोय अधिक पाहिलेली आहे. शिवसेनेने आपल्या स्टाईलने या विषयाचा मांसाहारी समाचार घेतलाच, पण त्याचबरोबर हा विषय व्यापक केला. मुंबईत तीन दशकांपूर्वी दाक्षिणात्यांचे वसतीकरण वेगाने होत होते. आता दाक्षिणात्यांपेक्षा उत्तर भारतीय अधिक वेगाने मुंबई परिसरात वसती करु लागले आहेत. त्यामुळे शिवसेनेने आता 'परप्रांतीय' हा शब्द उच्चारतांना मुख्य रोख या उत्तर भारतीयांवर ठेवला आहे. हे लक्षात घ्यायला हवे.

मुंबई परिसरातच नव्हे तर महाराष्ट्रातील छोट्या छोट्या खेड्यांमधूनही उत्तरभारतीय माणसे वस्तीला आली आहेत. नागपूर, औरंगाबाद, नाशिक, पुणे या वेगाने वाढणाऱ्या शहरांमध्ये परप्रांतीय मोठ्या प्रमाणांवर आले आहेतच, पण जेथे दिवसातून फक्त एकदाच एस.टी. जाते अशा छोट्या-छोट्या गावांमध्येही जेव्हा हे उत्तरभारतीय चिकाटीने नोकरी धंदा करताना दिसतात तेव्हा मराठी माणसाचा कैवार घेणाऱ्यांनी आत्मपरीक्षण करणे जरुरीचे बनते.

पुणे जिल्ह्यातील दौंड तालुक्यात 'पारगाव साळू-माळू' हे एक गाव आहे. अजित सरदारांचे सासरे व वसुधा सरदारांचे वडील, आबा करमरकर यांनी तेथे शेतीवरचे बरेच प्रयोग केले आहेत. शिवाय कार्यकर्ता प्रशिक्षणाची काही सोय केली आहे. सामाजिक परिवर्तनाच्या ध्यासाने तेथे चांगले काम उभे राहिले आहे. पंधरा वर्षांपूर्वी त्यांना भेटायला तेथे गेलो तेव्हा मी वेगळ्याच कारणाने चकीत झालो होतो! संध्याकाळी तेथील माझ्या कार्यकर्ता मित्राने आइस्क्रीम खायला मला गावात नेले. त्या इटुकल्याशा गावात संध्याकाळच्या वेळी चावडीवजा भागात एका राजस्थानी माणसाने आइस्क्रीमचा गाडा लावला होता. रॉकेलबत्तीच्या उजेडात तो तेथे आइस्क्रीम विकत होता.

एवढ्याशा गावात हा माणूस थेट राजस्थानाहून आला होता. जवळच असणाऱ्या नानगावात त्याचे आणखी साथीदार होते. जवळपासच्या छोट्या-छोट्या पाचसहा गावांमधून त्यांनी तसेच आइस्क्रीमचे गाडे लावले होते. एवढ्या छोट्या गावांमध्ये व्यवसाय करायला परवडते का असे मी त्याला विचारले तेव्हा तो म्हणाला, "राजस्थानात जे मिळते त्यापेक्षा इथे अधिक कमाई मी करु शकतो. शिवाय ग्रुपने राहणे, आइस्क्रीम बनवणे यामुळे खर्चही कमी येतो". त्या गावात त्याचा धंदा बऱ्यापैकी चालला होता. ही गोष्ट आहे पंधरा वर्षांपूर्वीची! पारगावात-नानगावात हजारभर मराठी माणसे राहत होती पण त्यांच्यापैकी









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कुणी आइस्क्रीम तयार करुन विकत नव्हते. परप्रांतातला एक माणूस तेथे येऊन हा व्यवसाय यशस्वी करीत होता. त्याचा व्यवसाय यशस्वी झाल्यानंतर 'हा आम्हाला नागवतो' म्हणून त्याच्याविरूद्ध गरळ ओकण्यात काय अर्थ आहे? हा मत्सर, द्वेष विकासाला हानीकारक आहेच पण मूळ प्रश्नावरुन लक्ष उडविणाराही आहे. मूळ प्रश्न आहे : एखादा पारगावकर आधीपासूनच तेथे गाड्यावर आइस्क्रीम विकत असता तर हा राजस्थानी तेथे कशाला आला असता?

संधीचा शोध घेऊन उद्योजकीय कौशल्याने यश मिळवणे ही कष्टसाध्य बाब आहे. आपल्यासमोर ती कुणी साध्य करते व आपल्याला मात्र ते जमत नाही म्हणून यश मिळविणाऱ्यांना दगड मारून काय साधणार? मूळ प्रश्न राहतो तो हा की, महाराष्ट्रभर परप्रांतीय येऊन जो काही पोटपाण्याचा व्यवसाय करीत आहेत तो त्या आधीच महाराष्ट्रीयनांनी का सुरु केला नाही? शिवाय जिथे कुठे महाराष्ट्रीयन माणूस होता तेथून त्याला हटवून परप्रांतीयांना कामधंद्यावर घेण्यात महाराष्ट्रीयन मालकही प्राधान्य का देतो? या प्रश्नांची खरी उत्तरे महाराष्ट्रवाद्यांना आवडणारी नसली आणि झोंबणारी असली तरी ती समोर येणे आवश्यकच आहे.

'परप्रांतीय' म्हणजे नेमके कोण ही व्याख्या अचूकपणे करणे आवश्यक आहे. जे मराठी बोलतात त्या सर्वांना आपण महाराष्ट्रीय म्हणणार आहोत की नाही? महाराष्ट्रात ज्यांच्या गेल्या चार पिढ्या नांदल्या पण जे घरात गैरमराठी बोलतात व मांसाहार करीत नाही, धोतर घालत नाहीत व पांडुरंगाऐवजी श्रीकृष्णाची वा शंभूची पूजा करतात पण व्यवहारात मात्र शुद्ध मराठी बोलतात त्या 'अमराठींना' आपण महाराष्ट्रीय म्हणणार आहोत की नाही? ज्यांची मागची-सध्याची पिढी महाराष्ट्रात नांदते व पुढची पिढी मराठी शाळेतच शिकते ते महाराष्ट्रीय आहेत की नाहीत?

महाराष्ट्रात अनेक पिढ्यांपासून नांदणारा अमराठी माणूस इथल्या संस्कृतीशी नाळ जोडतो. इथे कायमची वस्ती करतो. त्याला राजकारणाच्या सोयीसाठी परप्रांतीय म्हणायचे काय? बडोद्याचे गायकवाड, ग्वाल्हेरचे शिंदे, इंदोरचे होळकर, तंजावरचे भोसले हे त्या त्या राज्यांमध्ये आज 'परप्रांतीय' मानले जातात काय? परराज्यातून मराठी माणूस संसदेत निवडून येतो त्याचा आनंद मानायचा नि आपल्याकडे कृपाशंकर सिंह निवडून येतात त्याचे दुःख करायचे हा दुटप्पीपणा नाही काय? अमेरिकन राष्ट्राध्यक्षांच्या वर्तुळात महाराष्ट्रीय माणूस जागा मिळवतो. क्लिंटन यांचा एक सल्लागार जळगांव जिल्ह्यातील छोट्याशा खेड्याचा रहिवासी होता. यवतमाळ जिल्ह्यातील अनंत लाभसेटवार नावाचा एक गृहस्थ अमेरिकेत खाजगी बँक नि हजारो एकर जमीन विकत घेतो. इंग्लंडमध्ये बनारसे हे विदर्भातील मराठी उद्योजक मोठे औद्योगिक साम्राज्य उभे करतात. अमेरिकेत तर संगणक क्षेत्रात एकारान्त आडनावाची महाराष्ट्रीय मंडळी एवढी आहेत की आपण अमेरिकेत नसून कोकणात आहोत असे वाटावे! कॅनडात जगन्नाथ वाणी 'महाराष्ट्र मंडळ' चालवतात नि यशस्वी प्राध्यापक म्हणून नाव कमावतात. या सगळ्या मंडळींकडे तेथील स्थानिकांनी कुजकट नजरेने पाहिले तर आपल्याला काय वाटेल?

जगात आज तीन ते चार देशांमध्ये भारतीय वंशाचा माणूस पंतप्रधान आहे. परराष्ट्रीय संसदेत भारतीय वंशाची माणसे निवडून आली आहेत वा नियुक्त झाली आहेत. मॉरिशसच्या शिलाबाय बापू तर महाराष्ट्रीयच आहेत. हे 'ग्लोबलायझेशन' आपल्याला चालते पण आपल्याच देशातला, आपल्याच धर्माचा पण परप्रांतातला माणूस पोटापाण्यासाठी महाराष्ट्रात आलेला खपत नाही या मागचे नेमके इंगीत काय?

या मागे एक तर 'मराठी' व्होट बँक तयार करणे, दुसरे म्हणजे मुंबईवरची ढिली होणारी पकड पक्की करणे आणि परप्रांतीयांमधून भाजपाचा वाढता प्रभाव रोखून स्वतःचे मतदान वाढविणे हा शिवसेनेचा हेतू आहे. सेना राजकीयदृष्ट्या दुर्बळ होऊ नये म्हणून असेच कार्यक्रम हाती घेणार हे उघडच आहे. 'ग्लोबलायझेशन'च्या आजच्या युगात प्रादेशिक अस्मितांचा मुद्दा राजकारणाला उपयोगी पण अर्थकारणाला हानीकारक ठरू शकतो हे मात्र लक्षात घेतले पाहिजे.

परप्रांतीय मोठ्या प्रमाणावर महाराष्ट्रभर येण्याचे कारण रोजगार उपलब्धता हे आहे. ग्रामीण भागातील महाराष्ट्रीय माणूस शेती वा तत्सम उद्योगाबाहेर यायला तयार नाही. शेतीमुळे पिढ्यान् पिढ्या रक्तात घुसलेल्या स्थूलत्वामुळे स्थानांतरणाची इच्छा त्याने गमावली आहे. त्यामुळे संधीच्या शोधात फिरण्याची त्याची क्षमता कमी झाली आहे. याउलट परप्रांतीय माणूस त्याचा गाव-प्रांत सोडून महाराष्ट्रातल्या दूरवरच्या खेड्यात यायला तयार आहे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे आपण रोजगार मिळविण्यासाठी आलो आहोत याचे त्याला पक्के भान असते. कामावरची परप्रांतीयांची निष्ठा महाराष्ट्रीयन


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मालकांनीही जोखली आहे. फर्निचरचे काम करणारे यूपी-बिहार-राजस्थानचे सुतार-कारागीर सकाळी नऊ वाजता काम सुरू करतात, दुपारी जेवणासाठी पाऊण तासाची सुट्टी घेतात व रात्री सात-आठ वाजेपर्यंत सलग काम करीत राहतात. प्रसंगी हातातील काम संपविण्यासाठी रात्री नऊ-दहा वाजेपर्यंत काम करीत राहतात. नाश्त्याची सुट्टी, चहाची सुट्टी, लघवीची सुट्टी अशा सतरा सुट्ट्या ते दिवसभरात घेत नाहीत. महाराष्ट्रीय सुतार व यूपीचा सुतार या दोघांचाही अनुभव व्यक्तीशः मी स्वतः घेतला आहे. मी अकरावीत शिकत असताना वडिलांनी गावच्या सुताराला टेबल तयार करायला दिला होता, आता माझी मुलगी तीन वर्षांनी अकरावीत जाईल तरीही गावी त्या अधुऱ्या-अपुऱ्या टेबलचे अवशेष तसेच आहेत. ॲडव्हान्सची रक्कम घेऊन दारू पित फिरणाऱ्या त्या सुताराची हत्यारे सुद्धा कित्येक दिवस आमच्या घरी तशीच पडून होती.

परप्रांतीय माणूस नोकरी, व्यवसाय नि दैनंदिन रोजगार अशा तिन्ही बाजूने महाराष्ट्रात यश मिळवीत आहे. जम बसला की नोकरी सोडून तो कंत्राटदार बनतो नि पुन्हा आपल्याच प्रांतातल्या लोकांना स्वतःकडे नोकरीवर ठेवतो. हे चक्र वेगाने फिरत आहे. या यशस्वी कंत्राटदारांकडे असणारे व्यावसायिक कौशल्य, उद्यमशीलता, चिकाटी, कौटुंबिक सुखावर काही दिवसांसाठी पाणी सोडण्याची तयारी, स्थानांतर क्षमता, निर्व्यसनीपणा या गुणांकडे लक्ष न देता व स्वतःच्या निष्क्रीयता-आळसाकडे दुर्लक्ष करीत 'लुंगी हटाओ'च्या घोषणा आपण किती दिवस देणार आहोत?

महाराष्ट्राच्या विकासात परप्रांतातील या उद्यमशील माणसांनी मोठे योगदान दिलेले आहे. महाराष्ट्रातील वर्तमानपत्रे, शिक्षण, सांस्कृतिक उद्योग, साहित्य, सिनेमा, क्रीडा यात परप्रांतीयांनी मोठा सहभाग दिला आहे. कुठल्याही जिल्ह्यातील दोन-चार कॉलेजसची नावे वाचली तरी हे लक्षात येईल. अहमदनगर जिल्ह्याचेच उदाहरण घेता येईल : कोपरगाव सोमैय्या कॉलेज, संगमनेरचे मालपाणी कॉलेज, श्रीरामपूरचे डाकलिया कॉलेज, नगरचे सारडा कॉलेज ही वानगीदाखल देता येणारी उदाहरणे होत. पुण्यात नांदत असलेला धनराज पिल्ले हा भारतीय हॉकी संघाचा आधारस्तंभ आहे. महाराष्ट्रातील मराठी वर्तमानपत्र उद्योगातही जैन-दर्डा-गोएंका वगैरे मंडळी आघाडीवर आहेत. प्रकाशन व्यवसायातली मेहता, फुरिया वगैरे मंडळी आहेत. बॉलीवूडमध्ये तर मोठ्या प्रमाणावर परप्रांतीय आहेत. या सर्वांनी महाराष्ट्राच्या सर्वांगीण विकासात मोलाची भरच घातली आहे.

प्ररप्रातीयांमुळे शहराची बकाली वाढते असा मुद्दा पुढे आला आहे. हा मुद्दाही भ्रामक आहे. परप्रांतीयांऐवजी महाराष्ट्राच्याच ग्रामीण भागातला मोठा लोंढा शहरात स्थायिक झाला तरी हीच परिस्थिती उद्‌भवणार आहे. मुळात गावाकडे काम-धंदा नाही म्हणून तर माणसे स्थलांतरीत होतात. फ्लॅट घेऊन आरामात राहण्याएवढा पैसा या लोकांकडे असता तर त्यांनी स्थलांतरच कशाला केले असते? झोपडपट्टीत राहण्याची काही कुणाला हौस नसते. बकालपणा हा हतबल परिस्थितीतून जन्माला येतो. अनारोग्य, गलिच्छपणा, दारिद्र्य हे कुणालाच नको असते. नाईलाज म्हणून लोकांना तसे राहावे लागते. मुंबई तर मुळची कोळ्यांची होती मग हा बकालपणा नक्की कुणी-कुणी वाढवला? ते बिचारे कोळी तर काहीच बोलत नाहीत. बाकीचे पोटभाडेकरूच जास्त बोलताहेत. बाटगा मुल्लाच अधिक जोराने ओरडतो म्हणतात, तसेच हे!

घटनेने दिलेल्या सप्तस्वातंत्र्यानुसार परप्रांतीयांना महाराष्ट्रात येण्याची बंदी करता येणार नाही. एकीकडे ३७० वे कलम रद्द करा म्हणायचे व दुसरीकडे त्या स्वरूपाचे कलम मुंबईसाठी वापरायचे असे करून कसे चालेल? मूळ प्रश्न आहे तो असा की, आपण 'मराठा' आहोत की 'हिंदू'? आपण 'महाराष्ट्रीय' आहोत की 'भारतीय'? शिवसेनेने हे एकदा नक्की ठरवून घेतले पाहिजे. घरात वाढणाऱ्या पाहुण्यांमुळे बाथरूम अपुरे पडते म्हणून पाहुण्यांना हाकलून द्यायचे की बाथरूम मोठे करायचे? या प्रश्नाच्या उत्तरावर ज्याची त्याची संस्कृती, माणूसकी नि परिपक्वता ठरणार आहे.

विधानसभा निवडणुका जवळ आल्यावर शाकाहारी मंडळींचा मांसाहारी समाचार घेण्यापेक्षा अधिक व्यापक व स्पष्ट भूमिका घेणे सर्वांसाठीच दीर्घ हिताचे ठरणार आहे.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# अक्षरवेध

## विद्याकर वासुदेव भिडे

वेद शास्त्र संपन्न वामन विश्वनाथशास्त्री जोशी पावसकरकृत *'पुनर्विवाहशास्त्रसंग्रह'* या पुस्तकाचा परिचय

जिचा पती मृत झाला आहे अशा स्त्रीला विधवा म्हणतात. भारतीय समाजात कष्टमय, खडतर, उपेक्षित आणि अपमानित जिणे जगणारी आणि त्याचबरोबर सहृदय अंत:करणाच्या माणसाच्या मनांत दयेचा द्रव निर्माण करणारी व्यक्ती विधवा स्त्री आहे. त्यांतूनही तिला मुलगा नसेल तर तिची स्थिती अधिकच केविलवाणी होते. समाज तिच्याकडे सहानुभूतिशून्य दृष्टीने पाहतो. तिचे दर्शन अमंगल, अपवित्र आणि अपशकुनी मानले जाते. समाजाने विधवेला हीन मानले आणि शास्त्र-पुराणांनीही त्यांत भरच घातली.

'भूमीवर टाकून दिलेल्या मांसखंडावर ज्या प्रमाणे पक्षी तुटून पडतात त्याप्रमाणें समाजकंटक लोक विधवा स्त्रीच्या मागे लागतात' असे *महाभारत* म्हणते. वाल्मीकि म्हणतात, 'कुलस्त्रियांना वैधव्यासारखे दुसरे कोणतेही भय नाही.' सर्व संकटांमधे वैधव्य हे फार दारुण संकट होय.'

विधवेने वैधव्यकाल तसाच घालवावा. दिवसां काय रात्री काय दिवाभीताप्रमाणेच राहावे. अशा अपेक्षा समाज करीत असे. तिने मृतपतीबरोबर सहगमनच करावे अथवा विधवेने केशवपन करावे अशी अनिवार्यता तिच्यावर लादली जात असे. विधवा स्त्रियांच्या वाट्याला येणारे सर्वांत दु:खमय कर्म म्हणजे केशवपन होय. आज ही चाल नामशेष झाली असली तरी जेव्हां ही चाल प्रचलित होती तेव्हां अशा 'सोवळ्या' स्त्रियांना तीक्ष्ण वाक्बाण आणि प्रचंड मनस्ताप सहन करावा लागत असे. विधवेने पुनर्विवाह करण्याचा विचारही मनात आणू नये असे बंधन घालून सनातनी कर्मठ ब्राह्मण शास्त्रवचने सांगून तोंडे बंद करीत असत.

विधवांचा पुनर्विवाह शास्त्रसंमत आहे का? सहगमनाच्या विरोधी, केशवपनाचा निषेध करणारी वेदोक्त-शास्त्रोक्त वचने कोणती आहेत? या विषयी संशोधन करून पुनर्विवाहासंबंधी देशांत, महाराष्ट्रांत कोणते वाद झाले, पुनर्विवाहसंमतिदर्शक कोणती पुस्तके प्रसिद्ध झाली. या विषयी *पुनर्विवाहशास्त्रसंग्रह* या वामन विश्वनाथशास्त्री जोशी यांच्या पुस्तकाचा परिचय या ठिकाणी करावयाचा आहे.

विधवा पुनर्विवाह, सतीबंदी यावाबत प्रथम बंगालमध्ये प्रयत्न झाले. राजा राममोहन रॉय, केशवचंद्र सेन, ईश्वरचंद्र विद्यासागर यांनी प्रयत्न केले अशी सर्वसाधारण समजूत आहे. परंतु या विषयी सर्वप्रथम महाराष्ट्रांतच, पेशवेकालांत १७७० मध्ये पुणे शहरांत परशुरामपंत पटवर्धन सरदार यांचे वेळी कसबा पेठेत संकेश्वरपीठाधीश श्रीमान शंकराचार्य यांच्या उपस्थितीत वाद झाला याला कारण मराठी पहिला पुनर्विवाह! परशुरामपंत पटवर्धनांच्या प्रश्नाला न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांनी 'अल्पवयी, अजाण विधवामुलींचा पुनर्विवाह करणे पूर्णपणे सशास्त्र आहे, त्यास काही एक प्रत्यवाय नाही' असे उत्तर दिले. १८३७-३८ मध्ये महाराष्ट्रांत पुन्हा चर्चा प्रारंभ झाली. त्यानंतर बंगालमध्ये १८५५-५६ मध्ये प्रयत्न झाले आणि पुन्हा महाराष्ट्रांत १८६५ मध्ये प्रयत्न झाले.

*'पुनर्विवाहशास्त्र-संग्रह'* या नावाचे १२० पृष्ठांचे पुस्तक वे.शा.सं. वामन विश्वनाथशास्त्री जोशी पावसकर यानी १९१० मध्ये प्रसिद्ध केले. मुंबईच्या निर्णयसागर मुद्रणालयात ते वाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनी मुद्रित केले. (मूल्य दिलेले नाही). संपादक वामन विश्वनाथशास्त्री जोशी-पावसकर हे पुणे शहरांत नारायण पेठेत डोलकर आळीत राहत असत. तत्कालीन कर्त्या सुधारकांत त्यांची गणना केली पाहिजे कारण विधवा विवाह प्रतिबंध निवारकमंडळी, प्रौढ ऋतुमती विवाह, कोकणस्थ-देशस्थ-कऱ्हाडे मिश्र विवाह आणि बाल व प्रौढ विधवा विवाह पुनर्विवाहादी कार्यांत त्यांचा सहभाग असून अशा विवाहांत ते पौरोहित्य करीत असत. पुणे वक्तृत्त्वोत्तेजक सभेशीही त्यांचा संबंध होता.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

*विद्यासागर विजयकथा* या नांवाचे एक संस्कृत पुराण श्री. जोशी यांनी लिहिले आणि ते पुराण १९०४ पासून समारंभाचे दिवशी ते सांगत असत. त्या वेळी पुनर्विवाहास उपयुक्त अशी शास्त्रवचने, जी ईश्वरचंद्र विद्यासागरांनी शोधली होती ती ते सांगत असत. पुढे जसजसे जास्त वाचन होत गेले तसतसे विविध ग्रंथ, पुस्तके, पत्रके, निबंध यांतून आणखी पुरावे मिळत गेले आणि त्या सर्वांचेच एकत्रीकरण करून त्यांनी *पुनर्विवाहशास्त्रसंग्रह* हे पुस्तक सिद्ध केले. आपल्या कार्याबाबत श्री. जोशी म्हणतात, 'अशा प्रकारचे कार्य आताचे कोणी विद्वान करीत नाहीत कारण ते सर्व शालोपयोगी काव्ये, नाटके, कादंबऱ्या इत्यादिकांना टीपा-टिपण्या जोडण्यांत गुंतले आहेत. त्यांत त्यांना धनलाभ होतो. श्रुति-स्मृति-पुराण इतिहासादिकांकडे ते पाहतही नाहीत. लोकोपयोगी स्वतंत्र ग्रंथरचनेत लौकिक अधिक असला तरी किफायत मुळीच नाही. फारतर जेमतेम रमारमी व्हावयाची. तेव्हा असला आंतबट्ट्याचा व्यवहार कोण करणार? प्रस्तुत संग्रहकारासमुद्धा नेमका हाच धोका आहे पण त्यातून तो स्वतःची खाजगी दानधर्मपद्धति आणि सार्वजनिक याचकवृत्ति ह्या दोन्हींच्या भरवंशावर निभावून जाण्याची उमेद बाळगून आहे' एक समाजोपयोगी कार्य म्हणून वैयक्तिक लाभाचा विचार न करतां त्यांनी हे कार्य केले आहे.

विधवापुनर्विवाहास अनुकूल, सहगमनास विरोधी आणि विधवाकेशवपन विरोधात त्यांनी जी जी शास्त्रोक्त वचने शोधून काढली त्या सर्वांचा समावेश या पुस्तकात केला असून पुस्तकाला श्रीमान गोविंद चिमणाजी भाटे यांची इंग्रजी प्रस्तावना नऊ पानांची आहे. श्री. भाटे यांनी श्री. जोशी यांच्या कार्याची प्रशंसा केली आहे. ते म्हणतात, "Mr. Joshi's compilation is a good help to trace the history of this custom and the gradual change in the public opinion of the time. Mr. Joshi's object in compiling his book is to bring to the notice of the educated men the old healthy custom of widow marriage and thus enable them to guide public opinion in the right direction."

आपल्या संग्रहातील सर्व माहिती जुनीच आहे. परंतु मांडणी नवी आहे असे श्री. जोशी सांगतात. श्रुति-स्मृति व पुराणे ही एकूण एक साद्यंत वाचून काढून, त्यांचा नीट चांगला अभ्यास करून त्या त्या संग्रहांतील उपयुक्त वेचे काढले आहेत असे नाहीं कारण, श्रुति-स्मृति व पुराणांचे इतके उत्कृष्ट अध्ययन, अथपासून इतिपर्यंत होण्यास चांगल्या बुद्धिमान पंडितासमुद्धा पंचाईत पडेल, त्यास अनेक जन्म घ्यावे लागतील... तेव्हां प्रस्तुत संग्रहकारासारख्या अगदी सामान्य इसमास एवढे शक्य नाही' असे मान्य करून ते म्हणतात की, तूर्तातूर्त त्याला जे अनुकूल संस्कृताचे ज्ञान, साधली तेवढी पुनर्विवाह पुस्तकांची सामुग्री, सांपडला तेवढा फुरसतीचा वेळ, शक्य तेवढा प्रयत्न प्रामाणिक शोधाची निवड व निर्लेप विचार या सर्वांचा यथामति विनियोग करून पुढील संग्रह अशांपासून तो तहत सूज्ञांपर्यंत सर्वांपुढे ठेवला आहे.

श्री. जोशी यांनी वेगवेगळी जुनी पुस्तके वाचून, त्यांचा अभ्यास करून, जुन्या पुस्तकांतील मुद्रणदोष दूर करून, जेवढे पाठभेद आहेत ते सर्व घेतले आहेत. स्वतःला सोयीचा तेवढाच पाठभेद घेतलेला नाही. पुनर्विवाहासंबंधी कोणकोणती जुनी पुस्तके पाहिली त्यांची एक सूचीच त्यांनी दिली आहे. १८३७ पासून १९०८ पर्यंत एकूण ५७ पुस्तके देशाच्या विविध भागांतून प्रसिद्ध झाली. त्यात मराठी ३७, हिंदी ७, संस्कृत ६, इंग्रजी ४, गुजराती २ आणि बंगाली १ अशी आहेत. पुनर्विवाहविषयक धर्मशास्त्रीय वाद १८५५ ते १९०९ या कालांत एकूण आठ वेळां झाले. पुणे, धारवाड, काशी, अहमदाबाद, कोल्हापूर व मुंबई, मद्रास अशा गावी झाले. विधिवादी व निषेधवादी कोण होते, निर्णय काय झाले ते सांगतांना अनुकूल, संदिग्ध, मोघम, बरोबरी, निर्णय नाही, निषेध पक्षाने पळ काढला आणि एकवाद चालू अशी माहिती दिली आहे.

पुस्तकाच्या प्रारंभीच संग्रहकारिका संस्कृतांत असून त्यांत श्रुति, स्मृति, पुराणानि, शास्त्र-प्रामाण्याम् यांत भारत, मनु, अत्रि, लघुहारीत, जाबालि, लोगाक्षि, व्यास, कात्यायन, याज्ञवल्क्य, स्कंद, पराशर, बृहस्पति, वसिष्ठ, भविष्य पुराण, धर्मसिंधु यांचे संदर्भ आहेत.

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद यांतील सूक्ते, ऋचा दिल्या असून संदर्भ, सायणभाष्य, इंग्रजी, मराठी व हिंदी अशा क्रमाने ऋचांचे अर्थ दिले आहेत. पुनर्विवाहास अनुकूल असा अर्थ स्पष्टपणे किंवा अनुमानाने मिळतो अशाच ऋचा दिल्या आहेत.

परिशिष्टांमध्ये 'नियोग प्रकरणम्' यांत मनु, नारद, याज्ञवल्क्य यांची दहा वचने उद्धृत केली आहेत. 'सहगमन निषेध प्रकरणम्' यांत मृत पतीमागे सती जाऊ नये असे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सांगणारी पराशरमाधव, अंगिराः पैठीनसिः, व्याघ्रपात. स्मृति व अन्य अशी एकूण नऊ वचने आहेत. विधवा-वपन निषेध प्रकरणम्। यांत वृद्धमनुः, वसिष्ठ संहिता, मिताक्षरा, पराशरः, यमः, शंख, आपस्तम्बः, विजय संहिता, खगेश्वरसंहिता, अनंत संहिता, स्कंद यांतील एकूण वीस वचने आहेत. 'उरला मजकूर' या शीर्षकाखाली न्या. तेलंग, विष्णुबाबा ब्रह्मचारी, बाणभट्टाची कादंबरी यांचे संदर्भ देऊन वरील बाबत त्यांनी काय म्हटले आहे ते दिले आहे.

विविध ऋचादिकांमध्ये आलेले शब्द - उदा.: अग्रे दिधिषु, अन्य पूर्वा, परपूर्वा, दिधिषुः, पुनर्भूः, पौनर्भवः, पौनर्भवभर्ता इ. चे अर्थ वा.शि. आपटे, मोलियर विल्यम्स, डॉ. विल्सन, शब्दकल्पद्रुम, शिवदत्त पं. तारानाथ यांनी दिलेले आहेत. त्याशिवाय अमरकोश यास्क यांचे ही संदर्भ दिलेले आहेत.

लेखकाने जरी स्वतःकडे विनयाने न्यूनत्व घेतले असले तरी त्यांनी केलेले संशोधनकार्य फार मोलाचे आहे. सामाजिक सुधारणांबाबत इंग्रजी राज्याच्या आगमनानंतरच प्रयत्न झाले असे नसून सुधारणावादी वैदिकांनी स्त्रियांवर होणाऱ्या अन्याया-विरुद्ध, त्यांच्या उपेक्षेविरुद्ध, अपमानित, शोषित जीविताविरुद्ध धर्मशास्त्रीय पुरावे देऊन मूळ वैदिक धर्म, ऋषि हे कोणी कर्मठ, सनातनी नव्हते हे दाखवूनं देऊन सामाजिक सुधारणांना मोठे बल दिले. परंतु हेकट, कर्मठ, सनातनी लोकांच्या कडकडाटांत हा आवाज जास्त उंच गेला नाही. समाज गतानुगति-कतेच्या चक्रांत फिरत राहिला आणि त्यामुळे हिंदुधर्मावर मागासलेपणाचा, बुरसटलेपणाचा, स्त्रियांवर अन्यायकारक प्रथा, बंधने लादणारा असा ठसा बसला. मुळांत काय स्थिती होती याचा प्रत्यय अशा प्रकारच्या प्रयत्नांतून वाचकाला येतो हेच यातून समजते आणि त्यांतच या पुस्तकाचे यश आहे.




**Form IV**

रूल नं. ८, रजिस्ट्रेशन ऑफ न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वये प्रकाशित .

| | | |
|---|---|---|
| प्रकाशन स्थळ | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| प्रकाशन दिनांक | : | दरमहा १ तारीख |
| मुद्रक | : | श्रीकृष्ण गजानन दीक्षित, व्यवस्थापक, *नवभारत* मासिक |
| राष्ट्रीयत्व | : | भारतीय |
| पत्ता | : | द्वारा – प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| प्रकाशक | : | सीताराम रामचंद्र रायकर, चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई. |
| राष्ट्रीयत्व | : | भारतीय |
| पत्ता | : | द्वारा – प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| कार्यकारी संपादक | : | यशवंत मधुकर सुमंत |
| राष्ट्रीयत्व | : | भारतीय |
| पत्ता | : | ६७, 'सोबा' पार्क, सी-विंग, कोथरूड, पुणे ४११ ०३८. |
| मालक | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |

मी, सीताराम रामचंद्र रायकर जाहीर करतो, की वर दिलेली माहिती माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे संपूर्णतः खरी आहे.

**सीताराम रायकर**
प्रकाशक



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# वाद-संवाद

**नागनाथ कोतापल्ले**

वर्धा येथे डिसें. २००२ मध्ये संपन्न झालेल्या विचारवेध संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणावरील प्रतिक्रिया

*'नवभारत'*च्या डिसें. २००२ च्या अंकात श्री. वसंत पळशीकर यांचे त्यांनी वर्धा येथे दहाव्या विचारवेध संमेलनामध्ये केलेले अध्यक्षीय भाषण प्रसिद्ध करण्यात आलेले होते. त्यापूर्वी ते *समाज प्रबोधन पत्रिकेच्या* अंकातहीं प्रसिद्ध करण्यात आले होते. तेथे छापलेले भाषण संपादित स्वरूपातील होते. त्या भाषणावरील कॉ. कुमार शिराळकर यांची प्रतिक्रिया *समाज प्रबोधन पत्रिके*च्या पुढील अंकात प्रसिद्ध करण्यात आलेली होती. त्यापाठोपाठ *'नवभारत'* मध्येही हे भाषण पुन्हा प्रसिद्ध झाले. *'नवभारत'*मध्ये प्रसिद्ध झालेले भाषणही संपादित स्वरूपातीलच आहे. फक्त दोन्ही ठिकाणी संपादक वेगवेगळे असल्यामुळे संपादनाचे स्वरूप बदलले आहे.

संपादित स्वरूपाच्या मजकुराच्या आधारे प्रतिक्रिया लिहण्याच्या ऐवजी मूळ भाषणावरच प्रतिक्रिया देणे अधिक संयुक्तिक वाटल्याने येथे मूळ भाषणच आधाराला घेतलेले आहे.

आपल्या अध्यक्षीय भाषणात श्री. वसंत पळशीकर यांनी एका महत्त्वाच्या प्रश्नाची मांडणी केली आहे. "जागतिकीकरण आणि भारतीय समाजासमोरील यक्ष प्रश्न" असा त्यांच्या भाषणाचा विषय आहे. भारतीय इतिहासातील तसेच जगभराच्या इतिहासातील संदर्भ देत, धर्मविचाराची वाटचाल सांगत आणि मार्क्सवाद आणि गांधीवाद या विचारांची सांगड घालत त्यांनी विवेचन केले आहे. ते खूपच अभ्यासपूर्ण आणि तब्बल छापील ५८ पृष्ठांचा मजकूर असलेले भाषण आहे.

जागतिकीकरणामुळे पर्यावरणाचा ऱ्हास होत आहे शतकानुशतकांपासून जे जनसमूह आपल्या स्वतंत्र शैलीने जगत होते. त्यांच्या या स्वतंत्र आणि संस्कृतीसह जगण्यावर घाला घातला जात आहे, विकसित देश जगभरातील नैसर्गिक साधन संपत्ती आपल्या ताब्यात घेऊन मन मानेल तशा ख्याली-खुशालीत जगत आहेत आणि एकूणच मानवी जीवनातील सौख्य धोक्यात आले आहे. अशा परिस्थितीमध्ये भारतीयांसमोर तर लोकशाहीनेच प्रश्न निर्माण केले आहेत. भ्रष्टाचार आणि इतर असंख्य दोष या देशाला अधिकच दुबळे करीत आहेत. यातून सर्वांना सामावून घेणारा राष्ट्रवाद निर्माण झाला पाहिजे. या राष्ट्रवादाच्याअभावी भारतामध्ये असंख्य प्रश्न निर्माण झाले आहेत. हा असा राष्ट्रवाद कसा निर्माण करावयाचा हा महत्त्वाचा प्रश्न आहे. तसेच जागतिकीकरणाच्या आणि उदारीकरणाच्या रेट्यामध्ये भारतीय राष्ट्र-राज्याची सत्ता प्रबळ असली पाहिजे पण तशी ती नाही. त्याचे कारणही राष्ट्रवादाचा पायाच मुळी कच्चा राहिला आहे. तो निर्माण करावयाचा असेल तर मार्क्सवादाचे थोडेसे साह्य घेऊन गांधीवादाचा पूर्ण अवलंब केला पाहिजे. तरच जागतिकीकरण-उदारीकरण या धोक्यांमधून आपण मुक्त होऊ शकतो. अर्थात पश्चिमी सभ्यता नाकारणे आवश्यकच आहे. असे स्थूल मानाने त्यांच्या भाषणाचे सूत्र आहे.

जागतिकीकरणाच्या धोक्यातून कसे वाचायचे याबद्दल मतभेद होऊ शकतात. परंतु जागतिकीकरण आणि उदारीकरणामुळे उद्याच्या जगात केवळ विध्वंसच होणार आहेत याबद्दल साधारणतः स्वतःला पुरोगामी समजणाऱ्यांमुळे केवढे गोंधळ माजले आहेत याचे श्री. वसंत पळशीकरांनी जे विवेचन केले आहे, ते मात्र चकित करणारे आहे. शिवाय हे पुरोगामी कोण तर स्वतःला म. फुले आणि डॉ. आंबेडकरांचे वारसदार म्हणवून घेणारे पण समावेशक राष्ट्रवादाच्या उभारणीत मात्र सहभागी न होण्याचा अपराध करणारे. जे जे हिंदू आहे, त्या त्या गोष्टीला नाकारत जातात आणि त्यामुळे आजच्या गोंधळाच्या अवस्थेला तेच जबाबदार आहेत असा या विवेचनाचा साधारण रोख आहे. अर्थात हिंदुत्ववाद्यांचे आक्रमक हिंदुत्व श्री. वसंतरावांनी नाकारलेले आहे. परंतु हिंदुत्वातील काही गोष्टी तरी कबूल केल्या पाहिजेत ना; असा काहीसा त्यांचा सूर आहे.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. वसंत पळशीकर जे काही बोलत आहेत, ते अत्यंत तळमळीने, आस्थेने बोलत आहेत यात काही शंका नाही. परंतु त्यातून अधिकच गंभीर प्रश्न निर्माण होतात आणि त्यांना मान्य नसणाऱ्या आक्रमक हिंदुत्ववाद्यांवर आपोआपच पांघरूण घातले जाते.

मूळ भाषणातील पृ. १७ ते २१ वरील संपूर्ण मजकूर या दृष्टीने वाचून पाहण्यासारखा आहे. 'संघपरिवाराच्या घातक हिंदुराष्ट्रवादाचा प्रतिवाद' करताना हिंदुराष्ट्रवाद का वाढत गेला याची ते मीमांसा करतात. त्यामध्ये काही भारतीय आणि काही जागतिक पातळीवर घडणारी कारणे आहेत असे नोंदवितात. त्या पुढे ते असे म्हणतात - "या पलिकडचे एक कारण आहे. भारतात, आजच्या घडीला गौरवशाली इतिहास असलेले एक राष्ट्र आहे, आणि त्याला पुन्हा एकवार अव्वल मान असेले राष्ट्र म्हणून उभारावयाचे आहे, ते एक शक्तिमान महासत्ता वनले पाहिजे, असा कडवा राष्ट्राभिमान जोपासणारा संघपरिवार हा एकच पक्ष आहे असे हिंदू समाजाला आढळते. पुरोगामी सेक्युलर पक्ष, चळवळी इ. प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे हिंदू समाजाचा अधिक्षेप करण्यात धन्यता मानतात असा त्यांचा अनुभव आहे. आता भारतात हिंदू अस्मिता वाळगणारे, हिंदू म्हणून नोंदविलेले लोक बहुसंख्य आहेत. आणि आपले राष्ट्र म्हणावे असे त्यांच्यासाठी भारत हेच एक राष्ट्र आहे. ही दुहेरी वस्तुस्थिती आहे. येथेच आपल्याला गौण ठरविण्याची गोष्ट चालावी, याचा त्यांना राग यांवा या प्रकारच्या वक्तव्यांना, उपक्रमांना त्यांची तीव्र प्रतिक्रिया यावी हे स्वाभाविक नाही काय?"

म. गांधींचा सतत दुस्वास करणाऱ्या (व त्यातून पुढे काय झाले ते सर्वांनाच माहीत आहे.) संघपरिवाराबद्दल लोकांना जवळीक वाटू लागली आहे, आणि त्याचे कारण स्वतःला सेक्युलर म्हणून घेणारे, चळवळी करणारे आहेत असा याचा अर्थ होतो. खरोखर अशी परिस्थिती आहे काय?

१९२० नंतरच्या काळात म. गांधी यांच्या नेतृत्वाखाली भारतीय स्वातंत्र्य संग्राम अधिकाधिक तीव्र होत गेला. परिणामी १९४७ साली भारत स्वतंत्र झाला. या स्वातंत्र्य संग्रामात बहुजन, दलित आणि स्त्रिया सहभागी झाल्या. आणि उद्याच्या व्यवस्थेत हे महत्त्वाचे ठरणार आहेत, हे सूचित होत गेले. त्या काळातही ब्राह्मणेतर पक्ष काहीएक कार्य करीत होता आणि हिंदूंच्या पारंपरिक कल्पनांवर आघात करीत होता. त्याची प्रतिक्रिया म्हणून येथील समाज म. गांधी यांना सोडून संघपरिवाराच्या नादी लागला नाही. अशी उदाहरणे आणखीही देता येतील. मग साधारणतः आणीवाणीनंतरच्या काळातच हा बदल का झाला याचा शोध घ्यावा लागतो. कॉंग्रेसची सत्ता आणि आपल्या हितसंबंधीयांच्या वाहेर सत्ता (आणि संपत्तीही) जाऊ द्यायची नाही या धोरणाचा भारतीयांना वीट आलेला होता. या सत्ता लोलुपतेची परिणती आणीबाणी सारख्या घटनेत झाली आणि भारताच्या दुर्दैवाचे दशावतार सुरू झाले. संघपरिवाराला थोडासा सत्तेचा स्पर्श झाला आणि सत्तेची चटक त्यांना अस्वस्थ करू लागली. त्यातून असंख्य गुंते निर्माण झाले. संघपरिवाराने कुठल्याकुठल्या तडजोडी केल्या आणि गोवेल्स नीतीचा वापर केला हे श्री. वसंत पळशीकर यांना माहीत नाही असे थोडेच आहे? या शिवाय आणखीही एक महत्त्वाची गोष्ट नोंदविली पाहिजे. स्वातंत्र्यानंतरच्या काळात 'कल्याणकारी राज्य' आणि संमिश्र अर्थव्यवस्था इ. आम्ही वोलत असलो तरी प्रत्यक्षात भांडवलदारांना सहाय्यभूत होणे, त्यांना सर्व प्रकारच्या सवलती देणे हे चालूच होते. यातून समाज जीवनात असंख्य प्रश्न निर्माण होत गेले. समाजाच्या भ्रमनिरासाला प्रारंभ झाला. अशा सगळ्या परिस्थितीचा एक परिपाक म्हणून काही 'नव्या' लोकांनी संघपरिवाराला पर्याय म्हणून स्वीकारले. या नव्या लोकांची संघपरिवारातील जुने लोक वाट बघत होते असे नाही. पण सत्तेची चटक लागली होती.

अशी सगळी परिस्थिती आहे. यात आणखी खूपच भर घालता येईल. मुद्दा एवढाच की, सेक्युलर पक्ष, चळवळी यांच्यामुळेच लोक संघपरिवाराकडे गेले असे म्हणणे म्हणजे रोग डोक्याला आणि औषध पायाला अशी अवस्था आहे.

पुढे विचारवेध संमेलनाच्या व्यासपीठावर एकत्र आलेल्या परिवर्तनवादी चळवळीने आपली राष्ट्रवादाची वैठक कोणती, हिंदुत्ववाद्यांच्या राष्ट्रवादापेक्षा आपला राष्ट्रवाद वेगळा आणि चांगला कसा हे सांगावे असे आवाहन करतात. तसेच पुढे जे हिंदू ते ते टाकावू असे जे पुरोगामी समजतात तेही त्यांनी सोडून दिले पाहिजे आणि बहुसंख्य हिंदू समाजाला मध्यवर्ती ठेवूनच भारतीय राष्ट्राची उभारणी होऊ शकते हे त्यांनी लक्षात घेतले पाहिजे. शिवाय हिंदू माणसांच्या भावनांचा अधिक्षेप करीत राहून राष्ट्र उभारणी कशी करता येईल असा प्रश्नही ते उपस्थित करतात.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आता हा सगळाच मामला तपासून पाहता काय दिसते? परिवर्तनवादी चळवळीत खरोखर किती शक्ती आहे? किती लोक आणि किती साधने त्यांच्याकडे आहेत? एक तरी वर्तमानपत्र पुरोगाम्यांच्या मालकीचे आहे का? एखादे न्यूज चॅनल? एखादा साखर कारखाना? एखादा मोटार किंवा इतर कुठला कारखाना? हे पुरोगामी म्हणवणारे लोक आपापल्या परीने, मर्यादित साधनांसह समाजातील सामान्यांच्या उत्थानाचे कार्य करतात. असे कार्य करताना समाजात रूढ असलेल्या भाकड कथांच्या मागे स्वार्थ कसा आहे, हे त्यांना सांगावे लागते. आपल्या व्यवस्थेत, कोण कुणाचे कसे शोषण करीत आहे, हे सांगावे लागते. असे सांगणे म्हणजे हिंदूंची प्रत्येक गोष्ट नाकारणे कसे होईल? संघपरिवाराच्या प्रचारतंत्राचा परिणाम किती दिशाभूल करणारा असू शकतो याचे हे एक उत्कृष्ट उदाहरण आहे.

"हिंदूंना वगळून राष्ट्र उभारणीचा प्रकल्प हाती घेतला जाऊ शकत नाहीत" असेही ते सांगतात. आता हिंदूंना कोण वगळणार? म्हणजे वगळू शकणार? ज्या देशात बहुसंख्य हिंदूच आहेत त्या देशात त्यांना कसे आणि कोण वगळणार? देशातील बहुसंख्य उद्योगधंदे हिंदूंच्या मालकीचे आहेत. (जैनांचा समावेश हिंदूंमध्ये करावयास हरकत नाही.) येथील शेती मोठ्या प्रमाणात हिंदूंच्याच मालकीची आहे. लोकसभेत व विधानसभेत निवडून जाणारे शेकडा नव्वद टक्के हिंदूच आहेत. शिक्षणसंस्था आणि इतर ठिकाणची कर्तेधर्ते माणसे हिंदूच आहेत. शासकीय समारंभात हिंदू पद्धतीने पूजाअर्चा होतात, नारळ फोडले जातात, क्वचित यज्ञही केले जातात. सेक्युलर म्हणून घेणारे काँग्रेसवालेही कुठल्या तरी हिंदू बुवाच्या नादी लागलेले असतात. असे सर्वच, सर्व स्तरांवर, हिंदू आणि हिंदूच असताना त्याला वगळायचे म्हणजे तरी कसे असा खरा प्रश्न आहे. असे सगळे असताना हिंदूंना वगळून आपण विचार व चळवळ म्हणून नामशेष होऊ असे कसे म्हणता येईल? आणि या आत्मनाशाला आपणच जवाबदार असू असाही सज्जड इशारा त्यांनी पुरोगाम्यांना दिलेला आहे. ही संता घरची काय उलटी खूण आहे हे काही कळत नाही!

महापुरुषांची चिकित्सा केली पाहिजे असे ते म्हणतात, हे कोणाला तत्त्वत: अमान्य असण्याचे कारण नाही. पण 'माझा गणपती दूध प्याला' असे म्हणणाऱ्या सत्तेतील धेंडांची चिकित्सा करायची की नाही? 'मनुस्मृती' हीच आमची घटना म्हणणाऱ्यांची चिकित्सा करायची की नाही? सतीची चाल असती तर किती बरे झाले असते, कारण इंदिराबाई सती तरी गेल्या असत्या, असे म्हणणाऱ्यांची चिकित्सा करायची की नाही? चिकित्सा तर साऱ्यांचीच झाली पाहिजे. परंतु दुर्दैव असे की जे सांस्कृतिक क्षेत्रात सत्तास्थानी असतात, त्यांची चिकित्सा कुणी करीत नाही. आणि ती केली तरी ती करणारे विचारे पुरोगामी हेच जणू काही समाजाचे शत्रू आहेत, असे पाहिले जाते किंवा सांस्कृतिक वर्चस्ववाले गोबेल्स तंत्र वापरून त्यांच्याकडे तसे पाहण्यासाठी षड्यंत्र रचते. सामान्य लोकही त्याला बळी पडतात. परंतु वसंत पळशीकरांनी याला बळी पडावे हे न कळणारेच आहे. असो.

आता आणखी एकदोन मुद्यांचा परामर्ष घेऊन हिंदू या संज्ञेकडे यावयाचे आहे.

पृ. १९ वर पुरोगाम्यांच्या वेगळ्या राष्ट्रवादाच्या उभारणीसाठी पुरोगाम्यांनी अमेरिकेकडे पाहिले पाहिजे असे म्हटले आहे. म्हणजे जेथे अजूनही निग्रोंचे प्रश्न संपलेले नाहीत, आणि मूळच्या रेडइंडियन लोकांची कत्तल करणाऱ्या अत्यंत क्रूर अशा इतिहासातून सिद्ध झालेल्या अमेरिकन राष्ट्रवादाचे आदर्श पुरोगाम्यांनी ठेवावेत हे म्हणजे अतिशय चमत्कारिक आहे. एकीकडे पश्चिमी सभ्यतेला नाकारायचे, गांधीवादाचा स्वीकार करायचा आणि आदर्श म्हणून अमेरिकेकडे पहा म्हणून पुरोगाम्यांना सांगायचे याला म्हणावे तरी काय?

वस्तुत: अमेरिकेत उपलब्ध असणारी भूमी आणि अत्यंत कमी लोकसंख्या हे तिथल्या अनेक बाबींच्या मुळाशी असणारे वास्तव आहे. भारतात या उलट परिस्थिती आहे. या दोन देशांची तुलना होईलच कशी आणि भारतीय राष्ट्रवादाच्या वेगळ्या उभारणीसाठी अमेरिकेचे उदाहरण देण्याचे कारणच काय?

आणखी एक शंका अशी की राष्ट्रवादासारखी गोष्ट (म्हणजे एक राष्ट्र, एक लोक, एक इतिहास परंपरा, एक संस्कृती इ....) ही मानीव असते असे श्री. वसंत पळशीकर म्हणतात. खरोखर ही आणि यासारख्या गोष्टी केवळ मानीव गोष्टी (Imagined Shared Things) असतात का? खरे म्हणजे जगातली मोठी मानीव गोष्ट म्हणजे धर्मच आहे. सामान्य माणूस धर्मातील थोतांड कल्पनाही खऱ्याच मानतो. (धर्मामुळे माणसाच्या अपप्रवृत्तीवर अंकुश राहतो असे समर्थन केले जाते. असा अंकुश राहतो किंवा नाही ते आपण रोजच अनुभवतो आहोत.) म्हणजे द्वैत असो की अद्वैत असो, की विशिष्टाद्वैत असो - शेवटी ते मानीवच असते. तेव्हा धर्म



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि धर्मातील असल्या गोष्टी मानीव असतात. राष्ट्र, लोक, इतिहास, परंपरा, संस्कृती आणि राष्ट्रवाद यासारख्या गोष्टी केवळ मानीव कशा असतील? यातील पुष्कळसा भाग मानीव मात्र असत नाही. इतिहास आणि सर्व मर्यादांसह आपला इतिहास ही गोष्ट मानीव कशी असेल? माझी संस्कृती म्हणून जे काही सांगितले जाते ते मानीव कसे असेल?

आणि या सर्वांपेक्षा अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे राष्ट्रवादासारखी गोष्ट केवळ मानीव कल्पनांवर टिकत नाही. मानीव कल्पनांबरोबरच वास्तवातील भक्कम आधारही या गोष्टींसाठी महत्त्वाचे असतात. श्री. वसंत पळशीकरांचेच उदाहरण विकसित करावयाचे झाले तर बांगला देश केवळ मानीव कारणांमुळेच पाकिस्तान पासून वेगळा झाला असे नाही तर त्यासाठी सांस्कृतिक, आर्थिक आणि राजकीय कारणे होती हे कसे नाकारता येणार? आणि प्रत्यक्षात घरेदारे जाळायची, सत्तेच्या सर्व ठिकाणी आपणच जम बसवायचा आणि राष्ट्र, इतिहास, राष्ट्रवाद या गोष्टी मानीवच असतात असे म्हणायचे हे कसे मान्य व्हावे? मानीव गोष्टींबरोबरच प्रत्यक्षातील वर्तन कसे असते हेच अधिक महत्त्वाचे असते हे अमान्य करावयाचे कारणच काय?

भक्कम राष्ट्रवाद असावयास हवा आणि त्याचा पाया आपल्याकडे कच्चा राहिला आहे असे श्री. वसंत पळशीकर यांना वाटते. एकोणिसाव्या शतकामध्ये राष्ट्रवादाची कल्पना भारतात विकसित झाली आणि भारतीय राष्ट्रवाद हा युरोपीय राष्ट्रवादापेक्षा वेगळा होता, परंतु तो कच्चा असतांनाच स्वातंत्र्य मिळाले आणि स्वातंत्र्योत्तर काळातील काँग्रेस राज्यकर्त्यांनी या कच्चेपणाकडे लक्ष दिले नाही असे त्यांचे प्रतिपादन आहे. ही गोष्ट स्पष्ट करताना त्यांनी भारतीय इतिहासाचा विचार केला आहे. या इतिहासात मुसलमान सत्ताधीश होते व आपण सत्ताधीश असल्याची भावना मुसलमानांमध्ये होती व त्यामुळे राष्ट्रवादी जाणीव ठिसूळ राहिली असे काहीसे त्यांचे स्पष्टीकरण आहे. हे स्पष्टीकरण करताना मुसलमान राजवटीचे काही संदर्भ आले आहेत. ते म्हणतात, "मुस्लीम राज्यकर्त्या वर्गाच्या मनात हिंदुस्थान व त्यातील हिंदूजन यांना आपण जिंकून घेतले आहे, हा आपला मूळ मुलूख नव्हे आणि आपला इस्लाम हाच एकमेव सच्चा धर्म आहे, ही भावना शतकानुशतके कायम राहिली...."

आता मुस्लीम राज्यकर्त्यांना हा आपला मुलूख नव्हे असे वाटत होते हा तर्क ते कशाच्या आधारावर करीत आहेत? वस्तुतः मध्ययुगामध्ये जिंकलेला मुलूख आपलाच आहे अशीच भावना होती, हा मुलूख परक्यांचा आहे, असे जिंकलेल्या मुलूखाबद्दल वाटण्याचे कारणच नव्हते. हे मुसलमान राजवटीने सिद्धही केलेले आहे.

इंग्रज राज्यकर्ते येथील प्रदेशाला बाजारपेठ समजत होते व त्याप्रमाणे येथील पुष्कळशी धनसंपत्ती त्यांनी आपल्या मूळच्या भूमीमध्ये म्हणजे इंग्लंडला नेली. तसे मुसलमान राज्यकर्त्यांच्या बाबतीत दिसत नाही. उलट येथे विविध इमारती बांधणे, रस्ते करणे अशा सारख्या असंख्य सुविधा मुसलमान राज्यकर्त्यांनी केल्याचे दिसते. इथल्या लोकांशी प्रेमाचे संबंध निर्माण व्हावेत असा प्रयत्नही काही मुसलमान राज्यकर्त्यांनी केल्याचे दिसते. या प्रकारच्या संघर्ष-संवादातून, सुफी संप्रदायासारखा संप्रदायही निर्माण झालेला होता. तेव्हा एखादा प्रदेश जो जिंकतो, त्याविषयी जिंकणाऱ्याच्या मनात अभिमान, अहंकार असू शकतो, परंतु हा मुलूख आपला नव्हेच असे वाटण्याचे मध्ययुगात काही कारण नव्हते. मुसलमान येथे अनेक शतके राहिले यावरून त्यांना तसे वाटल्याचे दिसत नाही. या विधानाचा एवढ्या गांभीर्याने विचार करण्याचे कारण असे की संघ-परिवार 'मुसलमानांना ही भूमी आपली वाटत नाही' असे म्हणतो. आता पळशीकरांचे हे विधान त्याला जोडून घेतले तर मुसलमान त्यातून केवढा भयप्रद अर्थ निघतो व एकूण मुसलमान समाजावरच अन्याय होतो, हे वेगळे सांगायची गरज नाही! याच विवेचनाच्यापुढे धर्मांतरित मोठ्या मुसलमान समाजाला अभिजन राज्यकर्ता मुसलमान तुच्छ लेखत असे, लिहिले आहे. आता हे कशावरून असा एक प्रश्न आहेच, पण त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे सामान्यतः हीन वा अस्पृश्य गणल्या जाणाऱ्या जातीतील लोक धर्मांतरित झाले होते अशीही पुस्ती त्यांनी कंसात जोडली आहे. याचा अर्थ असाही निघतो की, ते हीन जातीतील होते म्हणून मुसलमान होऊनही तुच्छच लेखले जात होते. पण हा अर्थ त्यांना अभिप्रेत आहे असे आपण म्हणणार नाही. परंतु हीन जातीतील लोकच धर्मांतरित झाले का? वतनाच्या, राजकृपेच्या लोभामुळे धर्मांतरीत होणाऱ्यांची संख्या काय थोडी होती? अस्पृश्यांना मुसलमान धर्माचे आकर्षण वाटावे अशी येथील समाजरचना होती या वास्तवाची नोंद घ्यायचे नाही असे ठरविले तरी दुरून आलेल्या राज्यकर्त्याला राज्य

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चालविण्यासाठी सर्व स्तरातील लोकांची मदत लागते. ती येथील लोक करीत होते. आणि 'बहुसंख्य' असेल्या समाजातील लोकही धर्मांतरीत होत होते. अशा प्रकारच्या वस्तुस्थितीची नोंद आवर्जून करावयास हवी. नाही तर त्याचे विपरीत अर्थ काढायला व इतिहासाचे पुनर्लेखन काढायला संघपरिवार टपलेलाच आहे. पुढे, या मुसलमान राजवटी करायला 'लष्करी बळावर चालणाऱ्या सरंजामी' राजवटी होत्या असे त्यांनी म्हटले आहे. त्यात चुकीचे काही नाही. परंतु मध्ययुगातल्या सर्वच राजवटी अशा होत्या. हे सर्वच मध्ययुगीन राजवटीचे स्वरूप होते यांची नोंद करणे आवश्यक होते. येथे मुसलमान राजवटींचाच निर्देश केल्यामुळे जणू ते तसे एकटेच होते असा होतो. तसेच केवळ मुसलमान राजवटीची प्रतिक्रिया म्हणूनच हिंदूंनी इंग्रजांना मदत केली असेही त्यांनी सूचित केले आहे. या सगळ्याच गोष्टी पुन्हा एकदा मध्ययुगाच्या परिप्रेक्ष्यात तपासून घ्यायला हव्यात असे वाटते.

आता या त्यांच्या विवेचनात हिंदू आणि हिंदुस्थान हे शब्द पुन्हापुन्हा आले आहेत. हिंदूंना मुसलमानांनी जिंकून घेतले; पुरोगामी, डाव्या सेक्युलर इ. लोकांनी जे जे हिंदू ते ते नाकारले, हिंदूंना राग येणार नाही का? अशी पुष्कळ विधाने आलेली आहेत. याचा अर्थ हिंदू म्हणून काही एक धर्म येथे आहे, अशी श्री. वसंत पळशीकरांची खात्रीच दिसते. खरोखर सर्व जाती जमातींना एकत्र बांधून ठेवणारा असा कुठला धर्म येथे होता का? आहे का? केवळ मराठी साहित्याचा विचार केला तरी एकोणिसाव्या शतकापर्यंत हिंदू नावाचा शब्दच सापडत नाही. सनातन धर्म, वैदिक धर्म, ब्राह्मण धर्म, वारकरी-महानुभाव-लिंगायत संप्रदाय यासारखे शब्द सापडतात. यवन असा परक्यांसाठी बखरीत उल्लेख येतो. परंतु कोठेही हिंदू शब्दच सापडत नाही. एकनाथांच्या एका काव्याचे नाव 'हिंदू-तूर्क संवाद' असे आहे खरे. परंतु त्याचे मूळातील नाव 'ब्राह्मण तूर्क संवाद' असे असण्याची शक्यता आहे. कारण त्यातील संवाद तसेच आहेत. पुढे एकोणिसाव्या-विसाव्या शतकात कधी तरी हे नामकरण झालेले असावे. हिंदू असा उल्लेख का बरे येत नसेल असा खरा प्रश्न आहे. याच्या शोधातून आणखी काही तथ्ये हाती येतील. मग हिंदू या शब्दाचे आणि धर्माचे काय?

हिंदू हा प्रदेश वाचक शब्द आहे हे पुन्हा सांगण्याची आवश्यकता नाही. पण या शब्दाचा खरा स्वीकार इंग्रज येथे आल्यानंतरच सुरू झाला असे दिसते. येथील समाजाच्या गुणदोषांची चर्चा करण्यासाठी या शब्दाचा वापर हळूहळू सुरू झाला. म. फुले यांच्या संपूर्ण विवेचनात 'हिंदू' हा शब्द एकदा तरी आला किंवा कसे याबद्दल शंका आहे. लोकहितवादी, गो.ग. आगरकर यांच्या लेखनात 'हिंदू' शब्द दिसत नाही. अर्थात हे महत्त्वाचे लेखक सोडले तरी इतर काही लेखकांनी एकोणिसाव्या शतकात हिंदू हा शब्द वापरला आहे. पुढे विसाव्या शतकात क्रमाने या शब्दाचा वापर वाढत गेलेला दिसतो. संघपरिवाराने तर हा शब्द परवलीचाच बनवला! परंतु शब्द असणे आणि त्याचा निर्देशाने निर्देशित होणारा धर्म असणे या दोन वेगळ्या गोष्टी आहेत. येथे धर्म नावाची काही गोष्टच जेथे अस्तित्वात नाही, तेथे हिंदू जे जे आहे ते ते पुरोगामी नाकारतात हे म्हणण्यात काय अर्थ आहे?

साहजिकच असा प्रश्न निर्माण होतो की येथे हिंदू धर्म नसेल तर कोणता धर्म होता? किंवा नेमके काय होते? याचा अर्थ असा की, जाती याच स्वायत्त होत्या आणि धर्माचे स्थान प्राप्त व्हावे अशी त्यांची अवस्था होती. त्यांच्यात उतरंड होती आणि काही साम्ये होती हे खरे असले तरी मध्ययुगात तरी जातीच प्रबळ होत्या. 'जातीसाठी माती खावी' हे वास्तव होते. म्हणजे भारतीय राष्ट्रवादाची उभारणी करायची असेल तर जातींचे वास्तव समजून घेतले पाहिजे. धर्मांचे नाही. अर्थात हे वास्तव समजून घेत असताना या जाती निरर्थक झालेल्या आहेत, त्यामुळे त्यातून सर्वांनी बाहेर पडण्याच्या प्रयत्नातूनच सुदृढ राष्ट्रवादाची निर्मिती होऊ शकेल. अर्थात कोणी म्हणेल, मुस्लीम-ख्रिश्चनांमध्ये कोठे जाती आहेत? समतेचा पुरस्कार करणाऱ्या या धर्मांमध्येही जातींच्या मानसिकतेने प्रवेश केला आहे हे थोडा शोध घेतला की लक्षात येते. पुष्कळदा आपल्याकडील राजकीय निर्णय या जातीच घेतात, हे लक्षात घेतले की, हा मुद्दा स्पष्ट व्हावा.

असे असेल तर 'हिंदू' हा शब्द वापरण्याचा अट्टाहास कशासाठी? संघपरिवाराला येथील अंतर्विरोध झाकण्यासाठी एक मोठे पांघरूण म्हणून त्याचा उपयोग करता येतो. परंतु इतरांनी काय म्हणून तो शब्द वापरावा?

आता येथे पूर्वापार धर्मच नव्हता, हे ऐकायला, वाचायला अवघड आणि तार्कीक कोंडी करणारे आहे, हे खरे. परंतु वास्तव हेच आहे, त्यालाही इलाज नाही.

तेव्हा अस्तित्वात नसलेल्या धर्माबद्दल जर सेक्युलर, पुरोगामी मंडळी काही बोलत असतील तर त्याकडे दुर्लक्ष केले



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाहिजे. परंतु असे होत नाही. अस्तित्वात नसलेली गोष्टही प्रभावी प्रचारतंत्राद्वारे अस्तित्वात आहे असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला जातो. तसा प्रयत्न सध्या सुरू आहे. या प्रयत्नामागे सत्ताकांक्षा आहे. समाजातील आपले हरवलेले स्थान पुन्हा प्राप्त करून घेण्याची आकांक्षा आहे असे म्हणता येईल. या प्रचार तंत्राचा कसा मुकावला करायचा हा खरा महत्त्वाचा प्रश्न आहे. पुरोगामी, सेक्युलर काय बोलतात, यापेक्षाही हा प्रश्न गंभीर आहे.

थोडा वेळ आपण मान्य केले की, पुरोगामी, सेक्युलर मंडळींच्या 'जे जे हिंदू ते ते नाकारण्याच्या धोरणामुळे' आपला सर्व समावेशक वारसा नाकारण्याची 'घोडचूक' त्यांच्या हातून होत आहे आणि त्यातून आक्रमक हिंदुत्ववाद फोफावतो आहे. (जो पळशीकरांना मान्य नाही.) म्हणजे पर्यायाने पुरोगामी, सेक्युलर लोकांचेच नुकसान होत आहे. असे नुकसान त्यांनी करून घेऊ नये असाही यातून अर्थ निघतो. परंतु ज्यांनी असे धोरण अवलंबिले नाही, ती मंडळीही समाजात झपाट्याने अल्पसंख्य होत गेली. त्याचे काय? उदा. एकेकाळी समाजवादी म्हणवून घेणाऱ्यांचा मोठा दवदबा होता. थोडे वहूत राजकीय वळही त्यांच्याकडे होते. आज मात्र परिस्थिती नेमकी उलट झाली आहे. असे का व्हावे असा प्रश्न आहे. अर्थव्यवस्थेतील सूक्ष्म वदलांमध्ये तर या वास्तवाची विजे नाहीत?

सर्वसमावेशक असा राष्ट्रवाद वळकट केला तरच जागतिकीकरणाचा प्रतिवाद होऊ शकतो आणि त्यासाठी आधुनिक पश्चिमी सभ्यता नाकारली पाहिजे असा आणखी एक मुद्दा श्री. वसंत पळशीकरांनी मांडला आहे. हा मुद्दा मान्य करूनही प्रश्न उरतो तो असा की, ही आधुनिकता खरोखर नाकारता येणार आहे का? आणि ती नाकारायची असेल तर कशी नाकारता येईल?




आचार्य विनोबा भावे यांच्या भगवद्गीतेचा अर्थ ग्रथित करणाऱ्या *साम्यसूत्राणि* व *साम्यसूत्र-वृत्तिः* या दोन रचनांचे रसग्रहणात्मक मराठी विवरण

**विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे**

**वसंत नारगोलकर**

***क्रीड ऑफ सेंट विनोबा, विनोबा आणि मृत्यू, विनायकाचार्यांचा गीतार्थ* अर्थात् *साम्ययोग* या व इतर अनेक ग्रंथांचे कर्ते**

पहिली आवृत्ती १९९९ डेमी पृ. सोळा अ १५१ किंमत रु. १२०.००

**प्राज्ञपाठशाळामंडळ,**
३१५ गंगापुरी,
वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

**संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने**

सुधारित किंमत : १ एप्रिल १९९७ पासून लागू

- **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती)। तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — ३०० रु.
- **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध)। ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती — २०० रु.
- **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास**। डॉ. सुमंत मुरंजन — ६० रु.
- **हिंदी साहित्यविचार**। प्रा. प्यारेलाल गोहेल — ५ रु.
- **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदनग्रंथ** — ६० रु.
- **संशोधन साधना**। डॉ. वसंत स. जोशी — ४० रु.
- **तरंगयामिक व पुंजयामिक**। मा.ग. टोळे — १० रु.
- **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास**। ऋग्वेदी — ८० रु.
- **वागीश्वरी**। डॉ. गो.के. भट — ४० रु.
- **प्रस्थानभेद** (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण। गं.वा. लेले — २५ रु.
- **गिर्यारोहण परिचय**। अच्युत खोडवे — १० रु.
- **इतिहासाचे तत्त्वज्ञान** (दुसरी आवृत्ती)। सदाशिव आठवले — ८० रु.
- **दासशूद्रांची गुलामगिरी** (भाग २)। शरद् पाटील — १०० रु.
- **शाहीर हैबती**। डॉ. शिवाजीराव चव्हाण — ४० रु.
- **गीताचिकित्सा**। भाऊ धर्माधिकारी — १०५ रु.
- **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र)। सौ. मालती देशपांडे — २५ रु.
- **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार**। प.ल. वैद्य — ३० रु.
- **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती)। मे.पुं. रेगे — १६० रु.
- **पाच पुस्तक-परिक्षणे**। वा.म. कुलकर्णी — ४० रु.
- **भेदविलोपन : एक आकलन**। अशोक केळकर — २० रु.
- **कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य**। रा.भा. पाटणकर — ८० रु.
- **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार**। दि.के. बेडेकर — १५ रु.
- **आचार्य शं.द. जावडेकर : व्यक्तित्व आणि विचार** — १०० रु.
- **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** — १५० रु.
- **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे.पुं. रेगे — ८० रु.
- **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** — २०० रु.
- **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती)। सदाशिव आठवले — ८० रु.
- **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद)। वसंत नारगोलकर — १२० रु.
- **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन**। द.ना. धनागरे — ४० रु.
- **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह)। डॉ. म.अ. मेहेंदळे — ५५० रु.

*१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही. ३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.*

*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**


हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई